प्रकाशक :

श्याम दयार्णव कोपर्डेकर
इंद्रायणी साहित्य
२७३ शनिवार पेठ पुणे ३०

मुद्रक :

प्रमोद वि. बापट
प्रमोद प्रिंटर्स
१०१९ सदाशिव
नागनाथ पाराजवळ पुणे ३०



चित्रे :

ल. म. कडू, दत्ता महाबळेश्वरकर

प्रथमावृत्ती : २९ सप्टेंबर १९८१

किंमत : दहा रुपये

निसर्गाचे बाल-यात्री
राजस आणि
तेजस
यांना

## अनुक्रम





एक

# एक चिमुकला यात्रिक

ऑक्टोबरचा पहिला आठवडा. सकाळची नेहमीची कामे आटोपताना माझी नजर खिडकीतून बाहेर बागेत जातेय. बागेला पाणी घालण्याच्या नळाखाली स्वच्छ पाण्याचं छोटंसं तळं साचलंय; तिथे हौदाच्या कडेने उगवलेल्या गवताकडे, बागेच्या-भोवती घातलेल्या पिवळ्या टणटणीच्या बांधाच्या बाजूबाजूनं. कालही मी या जागा अशाच निरखिल्या होत्या. घरातून बाहेर येऊन बागेत चकरा मारल्या होत्या. काहीशा औत्सुक्यानं, काहीशा अस्वस्थपणानं बागेतल्या झुडुपांवरही मी शोधक नजर टाकली होती. काल मला तो काही दिसला नव्हता.

आज अजूनही दिसला नव्हता. सकाळी एकदा बागेतून माझी चक्कर झाली होती. नंतर कामाच्या गडबडीत बागेत येणं जमलं नाही. सकाळपासून कोणी ना कोणी येत होतं, त्यांच्याशी बोलण्यात वेळ जात होता. कामाच्या आणि विचारांच्या गर्दीत बागेत जाऊन त्याला शोधण्याचं मी विसरूनच गेलो.

दुपारी जेवणानंतर घरात उष्मा वाटायला लागला म्हणून घराबाहेर आलो आणि आंब्याच्या झाडाच्या शीतल छायेत जरा उभा राहिलो. एवढ्यात बागेतील नळाच्याखाली मला अस्पष्ट हालचाल जाणवली आणि चटकन त्याची आठवण झाली. थोडं पुढं जाऊन पाहिलं तर नळाखाली खरोखरच तो उभा होता. निश्चल, आपली लांब शेपूट सावकाश खाली-वर करीत. एक क्षणभरच तो तसा राहिला. मग नळाखाली साचलेल्या पाण्या-भोवती शेपूट हलवीत तुरतुरला, क्षणात एक उडी घेऊन बागेतल्या झाडाखाली भराभर फिरला. मग हौदाभोवती इकडेतिकडे पाहत, जमिनीवरचं किडुकमिडूक टिपत तो फिरला आणि थोड्या वेळानं उडून, हवेवर आंदोलत, केवळ पाच-सहा फुटांच्या उंचीवरून आमच्या बागेतून निघून गेला.

दरवर्षी ऑक्टोबरच्या पहिल्या आठवड्यात आमच्या बागेत येणारा धोबी पक्षी नेहमीप्रमाणे येथे दाखल झाला होता. इतक्या लांबच्या प्रवासानेही तो तसा दमलेला दिसला नाही. त्याच्या



पिसांचं ताजेपणही टिकून होतं. त्याचा रंग मात्र काहीसा फिक्कट वाटला. डोक्यावरची पिसं फिक्कट राखी रंगाची होती आणि पोटावरचा गडद पिवळा रंगही फिका पडल्यासारखा दिसत होता. उन्हाळ्याच्या सुरुवातीला येथून तो गेला तेव्हा त्याच्या काळपट आणि दोन पांढरे बारीक पट्टे असलेल्या पंखांवर पोपटी रंगाची झाक चढली होती. ती आता नव्हती. पंखही किंचित फिकट, मळकटच वाटले. मात्र हालचालींची गती, लय, चपळता नेहमी-सारखी वाटली.

चिमणीच्या आकाराचा, पण पांढऱ्या किनारी असलेली, काळपट लांब शेपूट असलेला, हा धोबी पक्षी ऑगस्टच्या अखेरीस सोव्हिएट युनिअनच्या प्रदेशात होता. सोव्हिएट रशियातील व्होल्गा नदीकाठच्या गवताळ प्रदेशात, दलदलीच्या किंवा पाणथळ भागांत तो कोठेतरी असावा. आपल्या इतर भाईबंदांच्यासमवेत किंवा तेथून पूर्वेकडे थेट वैकल सरोवरापर्यंतच्या उंच-सखल प्रदेशातून त्याने दक्षिणेकडे प्रस्थान ठेवले असावे.

जुलैच्या मध्यापर्यंत त्याची पिलं घरट्यातून बाहेर पडून इकडेतिकडे हिंडू लागलीही होती. पण तो आणि पिलांची आई अजूनही त्यांच्यावर लक्ष ठेवून होती. पिलांना अळ्या आणि उडते कीटक आणून भरवीत होती. पिलं हळूहळू स्वतंत्र होत होती, घरट्याभोवतालचा अधिकाधिक प्रदेश धुंडाळीत होती. आपल्या चिमुकल्या, भिरभिरत्या नजरांनी अनोखे जग पाहत होती. वरून उडणाऱ्या ससाण्याची, गरुडाची सावली दिसली की दाट गवतात दडू पाहत होती, हलकी साद घालून त्यांना त्यांचे आई-वडील पुन्हा एकत्र बोलावीत होते.

इकडे आई आणि वडील यांच्या हालचाली मात्र मंदावल्या होत्या. त्यांची पिसं हळूहळू गळून पडत होती. पंखांतील शक्ती थोडी कमी झाली होती. अशा वेळी सुरक्षित जागी राहून शत्रू-पासून बचाव करणं महत्त्वाचं होतं, पण ऑगस्टच्या दुसऱ्या आठवड्यापर्यंत ही स्थितीही संपणार होती.

आता त्यांना जी नवी पिसं फुटली, त्यांच्या छटा फिकट होत्या. शांत होत्या, मृदू होत्या. आजूबाजूच्या गवताशी, नदीकाठच्या वाळूशी, पाणथळ भागातल्या झाडोऱ्याशी त्यांचा रंग मिळताजुळता होता. त्यांचा रंग असा होता की लांबच्या प्रवासाला निघालेले हे पक्षी कोणाच्याच नजरेत चटकन भरले नसते.

त्यांना संपूर्णपणे नवी पिसं फुटली आणि अंगात भरलेला आळसटपणा निघून गेला. शरीरात पुन्हा चैतन्य सळसळू लागलं, उत्कंठा वाढू लागली. आता नर आणि मादीला इतरांच्या जवळीकीची ओढ वाटू लागली. लवकरच अशा कित्येक जोड्या एकत्र आल्या. धोबी पक्ष्यांचा हा समूह आता एकत्रितपणे इकडेतिकडे हिंडू लागला. मधूनच अस्वस्थपणे तो सैरभैर उडत होता. मध्येच जमिनीकडे झेपावत होता, पुन्हा उंच उडत होता. घरट्याभोवतीचं संकुचित जग संपत आलं होतं. क्षितिजं विस्तारीत होती. नजरा दूरदूरचे प्रदेश धुंडाळीत होत्या. रात्री हे सगळे पक्षी एकत्रितपणे लांब दांड्याच्या उंच गवतात निवाऱ्यासाठी जमत होते.

एक दिवस मात्र त्यांची अस्वस्थता शिगेला पोहोचली. तो दिवसच तसा होता. हवा सुंदर होती, प्रसन्न होती. वाळत चाललेल्या गवताचा आणि मलूल पडत चाललेल्या रानफुलांचा मंद गंध दरवळत होता. वातावरणात थंडीची चाहूल जाणवत असली तरी हवा कुंद नव्हती की भगभगीत उन्हाळी नव्हती. सबंध दिवस पक्ष्यांचा हा थवा चिवचिवाट करीत उडत होता. येरझारा घालीत असलेल्या माणसासारखा.

सायंकाळ झाली. पक्षी अजूनही हवेत चकरा घेत होते. अभावितपणे ते घरट्यांच्या जागापासून दूर आले होते. सकाळपासून चकरा घेऊनही कोणी दमलं नव्हतं. प्रत्येकाने आपल्या शरीरात स्निग्ध पदार्थांचा भरपूर साठा करून ठेवला होता.

...आणि एका सुंदर क्षणी त्या पक्ष्यांना एकदम काहीतरी जाणवलं. अभावितपणे त्या थव्यानं एकदम उंच भरारी घेतली.



उंची गाठल्याबरोबर मोकळ्या आकाशाचं, उंचावरच्या हवेचं आणि अथांग तारकासमूहाचं सान्निध्य त्यांना जाणवलं. आता एका तालात, एका लयीत, एका दिशेनं ते उडू लागले. दक्षिण दिशा त्यांना खुणावीत होती, तारका त्यांना दिशा दाखवीत होत्या. साडेतीन-चार हजार मैलांच्या (सहा हजार किलोमीटर) प्रवासाला सुरुवात झाली होती.

रात्रीच्या थंड हवेत असाच रोज प्रवास करीत त्यांनी मध्य आशियातील रखरखीत वाळवंटे ओलांडली. सकाळच्या वेळी वाळवंटात मधूनमधून लागणाऱ्या पाणथळीभोवती त्यांनी वेळ काढला. वाळवंटातील टेकड्यांच्या सावलीत कुठे थोडे खुरटे गवत असायचे. त्याचा तेवढाच त्यांना आधार वाटे. रोजचा त्यांचा प्रवास साधारणपणे दोनशे किलोमीटरचा होई. ठिकठिकाणी, योग्य जागा दिसली की तो थवा काही वेळ विश्रांतीसाठी खाली उतरे आणि पुन्हा उडू लागे. दिवसातले चार-पाच तास उडायचं. बाकीचा वेळ विश्रांती घ्यायची. वेळ काढायचा.

मजल दरमजल करीत ते आणखी दक्षिणेकडे सरकले. आता वैराण वाळवंटे संपली आणि पर्वत दृष्टिपथात आले. प्रथम बुटक्या टेकड्या, नंतर उंच सुळके आणि शेवटी हिमाच्छादित शिखरे. पक्ष्यांचा तो थवा जेव्हा पर्वतांच्या कुशीत शिरला तेव्हा त्यांची संख्या काहीशी रोडावली होती. वाळवंटातल्या कडक उष्म्याने नुकत्याच अंड्यातून बाहेर पडलेल्या काही पिलांचा घास घेतला होता. वाळूच्या वादळात सापडूनही काही गारद झाले होते. चौथ्या-पाचव्या खेपेला हा प्रवास करणारे काही वयस्क पक्षीही वाऱ्या-वादळाचा तडाखा सहन करू शकले नव्हते.

आता नवीनच संकटे त्यांच्यापुढे उभी ठाकणार होती. पर्वतांच्या आश्रयानें वाढणारी थंडी त्यांना डंख मारण्यास उत्सुक होती. पर्वत पार करण्यासाठी ते जसे उंचावरून उडू लागले, तशी ही थंडी त्यांना ग्रासू लागली. चिंचोळ्या खिंडीतून पार होताना तर हिमवादळाची तीक्ष्ण शस्त्रे उपसून तिने या चिमुकल्या पक्ष्यांवर

झडप मारली. जे ही संकटे सहन करू शकले नाहीत, ते तिथेच पडले, पण या मृत्युसंकटावर मात करणारेही हिंमतवीर निघालेच. त्यांनी थंडीला न जुमानता पर्वत पार करून सखल प्रदेशात प्रवेश केला.

काही खैबर आणि बोलन खिंडीतून पंचनदांच्या सुपीक प्रदेशावर आले. काहींनी उत्तर हिमालयातून काश्मीरच्या पाचूखोऱ्यात प्रवेश केला तर काहींनी हिमालयाची प्रमुख रांग ओलांडून, तराईचा दलदलीचा प्रदेश पार करून गंगा-यमुनांच्या समृद्ध मैदानात मुक्काम केला.

आता थंडी मागे पडली होती. गार वाऱ्याच्या झुळका सुखद वाटत होत्या आणि पावसाच्या झडींनी तहान पळाली होती. भूमी हिरवीगार होती, गवते तरारली होती, रानफुले बहरली होती. कीटक गुंजन करीत भिरभिरत होते, झाडे पानाफुलांनी नटली होती. काही आता या मैदानी प्रदेशातच स्थिरावले— नदीकाठाने, कमलवेलींनी आच्छादिलेल्या तळ्यावर, हिरव्याकंच कुरणातून. काही आणखी दक्षिणेकडे सरकले. पहाडांतून फिरले, झऱ्यांवर विसावले, गजबजलेल्या शहरांमधून फिरले, ठिकठिकाणी विखुरले.

माझ्या बागेत उतरलेला मुसाफीर असाच त्यांच्यापैकी असावा. फार मोठ्या दिव्यातून सहीसलामत बाहेर पडलेला—शूर, साहसी आणि सुदृढ. आता तो माझ्या हिरवळीवर बागडणार होता, तुरतुरणार होता. कुठे पाण्याचा ओहोळ दिसला, साचलेले पाणी दिसले की थबकणार होता. कीटक टिपणार होता. प्रारंभी तो आपल्या हिरवळीबद्दल फार जागरूक राहणार होता. त्याचेसारखाच कोणी आला तर त्याला हाकलून देणार होता. दिवसभर असा बागांतून, कुरणांतून नदीकाठाने विहरणार होता, मध्येच कीटक पकडण्यासाठी हवेत झेपावणार होता. गुरांच्या पायांमधून बागडणार होता. सायंकाळी सारे पुन्हा एकत्र येणार होते, लहान-लहान थवे एकमेकांत मिसळणार होते. एक मोठा थवा उडणार होता. उंच दांड्यांच्या गवतांच्या, उसाच्या शेतांच्या दिशेने. शेत-



गवत जवळ येताच आकाशातून उल्का पडावी, तसा एकदम शेतात उतरणार होता.

दिवस असेच जाणार होते. थवे थोडे रोडावणार होते, कारण थंडीबरोबर ससाणे आणि गरुडांची पिलंही वाढत होती. त्यांचे माता-पिता अन्नाच्या शोधात होते आणि या चिमुकल्या, रुचकर पक्ष्यांचा घास पिलांना भरवू इच्छित होते. पण त्यांचा हल्ला यशस्वीपणे चुकवणारेही कमी नव्हते. थंडी सरत आली आणि हवेत उष्मा वाढू लागला. तशी पुन्हा एकदा या पक्ष्यांना अस्वस्थता जाणवू लागली. दिवस मोठा होत होता, आकाश निरभ्र होते. त्यांच्या शरीरात काही आंतरिक बदल होत होते. लवकरच पुन्हा एकदा जुनी पिसे गळून नवी फुटू लागली. डोक्याचा रंग गडद निळसर राखी होऊ लागला. पोट आणि छाती जर्द पिवळी झाली. पंखांत आणि पाठीवर सतेज हिरवी झाक जाणवू लागली. निरनिराळ्या ठिकाणी पांगलेले पक्षी आता दिवसाही एकत्र येऊ लागले. अस्वस्थपणे हे थवे येथून तिथे उडू लागले.

पुन्हा एकदा प्रयाणाचा दिवस जवळ आला. आपल्या शरीरात होणारे बदल काही पक्ष्यांना फारच जाणवू लागले होते. ते सर्व नरपक्षी होते. अशा अस्वस्थ मन:स्थितीत काही नरपक्षी एकत्र आले आणि एका सायंकाळी हवा स्वच्छ असताना, त्यांनी उत्तरेकडे कूच केले.

काही कच्छच्या रणातून सिंधमार्गे पर्वतांना भिडले, तर काही पूर्वेकडून ब्रह्मपुत्रेच्या घळईतून हिमालयाला वळसा घालून उत्तरेकडे निघाले. काही तर सरळ हिमालयाच्या प्रमुख रांगांनाच भिडले आणि कडाक्याच्या थंडीला, हिमवादळांना न जुमानता पार झाले. जे दमले, शिणले, रोगांनी पिडले ते अर्थातच पार होऊ शकले नाहीत. जेवढे दक्षिणेकडे येण्यास निघाले होते. त्यांपैकी निम्मेशिम्मेच परत उत्तरेकडच्या आपल्या जन्मभूमीपर्यंत पुन्हा पोहोचू शकले.

प्रथम पोहोचले ते सर्व नरपक्षी होते. मात्र जन्मभूमी जवळ

येताच हा थवा भंग पावू लागला. प्रत्येकजण स्वतःसाठी योग्य जागा पाहू लागला. तेथे दुसरा नर आलेला त्याला खपेना. जोरजोराने ओरडून गाऊन तो आपल्या प्रदेशाचे स्वामित्व जाहीर करू लागला. एके दिवशी मात्र दोन नरपक्ष्यांमध्ये चांगलीच लढत लागली. एक मादी दोन पक्ष्यांच्या प्रदेशाच्या सीमेवर येऊन उतरली होती आणि आपला पिसारा फुलवून, आपल्या छातीवरची सुंदर पिवळी पिसे दाखवून दोघंही तिला आपल्या प्रदेशात बोलावीत होते.

पण लवकरच माद्यांचे एकामागून एक थवे येऊन पोहोचले आणि प्रत्येकाला सहचारिणी लाभली. आपल्या जन्मभूमीकडे परतताना प्रत्येकीला घाई झाली होती. नेहमीचा दीडदोन महिन्यांचा प्रवास आता सुमारे सव्वा महिन्यातच पूर्ण झाला होता.

मादीने आपला सहचर निवडला आणि लगेच घरट्याची बांधणी सुरू केली. नरपक्षी तिला मदत करीत नसला तरी तिच्याभोवती घोटाळत होता. तिचं इतरांपासून रक्षण करीत होता. मादीनं दाट गवताच्या पुंजक्याच्या तळाशी गोलाकार घरटं विणलं, मऊमऊ पिसं, कापूस, धागे आणून त्याला आतून अस्तर केलं. लवकरच त्या गवताळ, ओलसर प्रदेशात अंतराअंतरानं अनेकांचे संसार उभे राहिले. प्रत्येकजण आपल्या प्रदेशात स्वतंत्र होता, पण सर्वांनाच एकमेकांचा आधार होता.

लवकरच मादीने राखी-तपकिरी रंगाची चार-पाच अंडी घातली. बहुतेक अंडी अगदी सकाळी सकाळी घातली गेली. शेवटचे अंडे घालून मादी अंडी उबवायला बसली. या कामात मात्र नरपक्षीही तिला मदत करीत होता. दोघेही आळीपाळीने अंडी उबवीत. घरट्याकडे येताना अतिसावधगिरीने, वळणावळणाने येत, कोणी शत्रू दिसताच कोलाहल करून स्वतः जखमी झाल्याचे नाटक करून त्याला घरट्यापासून दूर नेत.

पंधरवड्यानंतर अंड्यांतून पिले बाहेर पडली. पिलू बाहेर



आल्यावर मादीने अंड्यांची टरफलं उचलून दूर नेऊन टाकली आणि घरटे स्वच्छ केले. पिलांचे डोळे मिटलेलेच होते. पण घरट्याजवळ जरा हालचाल झाली की त्यांची चिमुकली, आतून लाल-नारिंगी असलेली तोंडे वासत आणि त्यांना भरविल्याशिवाय आई-बापांना राहवत नसे. माशा, उडते कीटक, अळ्या, लहान टोळ यांवर पिले वाढू लागली. प्रथम त्यांना भीती कशी ती ठाऊक नव्हती. घरट्याजवळ बारीकशी खसखस झाली तरी अपेक्षेने त्यांची तोंडे वासली जात. सहाव्या-सातव्या दिवसांपर्यंत मात्र त्यांना थोडीफार पिसं फुटली होती, पंखात बळ आले होते, डोळे उघडलें होते. आता कुठे खुट्ट वाजलं तरी ती लपायला पाहत होती. आई-वडील घरट्याजवळ आले की बारीक शीळ घालून त्यांना दिलासा देत होते, भरवीत होते. आई-वडिलांच्या पिसांचा पिवळा रंगही त्यांच्या परिचयाचा झाला होता. आई-वडिलांनी त्यांना स्वच्छतेची सवय लावली होती, घाण घरट्याबाहेर करायची, घरटं स्वच्छ ठेवायचं, हे त्यांना कळलं होतं.

अंड्यातून बाहेर पडल्यापासून दहा-अकरा दिवसांत पिलं इतकी वाढली की ती घरट्याबाहेर पडू लागली, पंख हलवून व्यायाम घेऊ लागली, धोका वाटला तर पानाखाली, झुडपात दडू लागली. अजूनही आई-बाप त्यांना भरवीत होते. पण स्वतःही कीटक पकडण्यास ती शिकत होती.

लवकरच हे दिवस सरले. पिले आता स्वतंत्र झाली होती, त्यांच्या हालचालींची कक्षा वाढत होती, ती थव्यात मिसळू लागली होती.

त्यांच्या आई-वडिलांच्या हालचाली अंमळ मंदावल्या होत्या. जुना पिसारा गळून पडणार होता, नव्या ताकतीची पिसं फुटणार होती, कारण प्रवासाचा दिवस जवळ येत होता.

आता त्यांची अस्वस्थता वाढणार होती, थवे इकडून तिकडे भिरभिरणार होते, एका सायंकाळी जन्मभूमी सोडून जाणार होते.

इकडे माझीही अस्वस्थता वाढत होती. नजर सतत बागेकडे जात होती, कारण हिरवळीच्या कडेला साचलेल्या पाण्यावर एक दिवस एक चिमुकला पक्षी मला भेटणार होता.

✠ ✠



काही दिवसांपूर्वीची गोष्ट. त्या संध्याकाळी वाटेवरल्या ओहोळाच्या काठी अचानक मला तो दिसला. मी नेहमीप्रमाणे माझ्या आवडत्या रस्त्याने फिरायला चाललो होतो. वाटेशेजारून वाहणाऱ्या ओहोळाने जिथे वळण घेतले होते, तिथे नेहमीप्रमाणेच कलकलाट करून टिटवीने माझे स्वागत केले. पण तिच्या पाठोपाठ आणखी एक लहानसर पक्षी पाण्याशेजारून अलगद उठला आणि टिव्–टिव्–टिव् अशी लकेर मोठ्या तालात फेकीत वेगाने उडून गेला. ' आज ना उद्या तुझी गाठ पडणार, याची खात्रीच होती बेटचा ! ' मी मनातल्या मनात म्हणालो. या हंगामात तुतारी पक्ष्याची भेट सप्टेंबरच्या सुरुवातीसच झाली. आता तर काय, ऑक्टोबर महिना सुरू झाला. स्थलांतरित पक्ष्यांच्या बिनीच्या तुकड्या आपल्या देशात येऊन दाखल झाल्यासुद्धा.

पावसाळा सुरू झाला की, माझ्यासारख्या पक्षीवेड्या माणसाची उत्कंठा वाढू लागते, एक प्रकारची अनामिक हुरहूर मन व्यापून टाकते. घराबाहेर पडले की, आज कोणता नवा चेहरा दिसतोय– म्हणून नजर भिरभिरू लागते.

या वर्षी चातक पक्ष्याला मी जूनच्या पहिल्या पंधरवड्यातच पाहिले. शीळ घालीत एकमेकांचा पाठलाग करण्यात गुंग झाली होती चातकांची ती जोडी ! ऐटबाज काळा तुरा आणि कडा कातरलेले लांब शेपूट असलेला हा काळा-पांढरा पक्षी दिसायला मोठा बिलंदर दिसतो आणि तो आहेसुद्धा तसाच ! कोकिळाच आहे ही एका जातीची. कावळ्याची नजर चुकवून कोकिळा जशी त्याच्या घरट्यात अंडी घालते, तद्वत चातक पक्षी सातभाईंना चुकवून त्यांच्या घरट्यांत अंडी घालतात. या बिलंदर पक्ष्याने शास्त्रज्ञांनाही असाच गुंगारा दिलाय ! कारण पावसाळ्याच्या सुरुवातीला ही स्वारी अकस्मात कोठून उगवते आणि नंतर कुठे गायब होते, हे अजून त्यांनाही नीटसे समजलेले नाही. कोणी म्हणतात, चातक पक्षी आफ्रिकेतून अरबस्तान-पाकिस्तानमार्गे भारतात येतो !





चातकाच्या आगमनाच्या सुमारासच ' कारुण्य-कोकिळाही ' ऐकू येऊ लागते. बुलबुलाच्या आकाराची, भुरकट-काळपट रंगाची ही छोटी कोकिळा झाडाच्या पानांत सहज लपून जाते आणि चटकन दिसत नाही. पण पीऽऽव् पीऽऽव् अशी तिची करुण

लकेर खूप लांबवर ऐकू येते. पावसाळा संपत आला की, हा पक्षीही इथून गायब होतो.

ऑगस्ट-सप्टेंबरच्या सुमारास मात्र खऱ्याखुऱ्या स्थलांतरित पक्ष्यांच्या आघाडीच्या तुकडया दाखल होण्यास सुरुवात होते. तुतारी पक्षी ऑगस्ट अखेरीसच दिसू लागतात. पाणथळ जागेवरून, पाण्याच्या काठाने, पार्श्वभाग हलवीत उभे राहिलेले किंवा तुरूतुरू धावणारे हे पक्षी मोठे गमतीदार दिसतात ! पांढऱ्या पार्श्वभागाचा, हिरवट रंगाचा तुतारी पक्षी हा इतरांच्या मानाने अगोदर येऊन दाखल होतो, असा माझा अनुभव आहे. तुतारी पक्ष्यांच्या जातींमध्ये हा आकाराने मोठा आहे. तो एकटा-दुकटाच आढळतो, तर त्यापाठोपाठ साध्या तुतारी पक्ष्यांचे चमू येऊन पाण्याच्या आसपास उतरतात. कोंबडीच्या पिलाहून थोड्या मोठ्या आकाराचा, मातकट रंगाचा हा पक्षी काश्मीर, गढवाल किंवा त्यापेक्षाही उत्तरेकडील भागांतून आपल्याकडे येतो आणि नंतर येतात ठिपकेवाल्या तुतारी पक्ष्यांचे कळप आणि गळ्याभोवती पांढरी कॉलर आणि कपाळावर पांढरा ठिपका असलेले प्लोव्हर पक्षी. ते येतात सायबेरिया आणि उत्तर युरोपच्या अति थंड प्रदेशातून. ऑक्टोबर महिन्याच्या सुरुवातीस, स्थलांतराच्या हंगामास अशी मोठ्या जोषात सुरुवात होते आणि एकापाठोपाठ एक हिवाळी पाहुणे आपल्याला भेटण्यास येऊ लागतात. माझ्यासारख्याची एकच धांदल उडून जाते त्यामुळे. पाहता पाहता धोबी पक्ष्यांच्या टोळ्यांना डोळे सरावतात. गोड किलबिल करीत, हवेतून खाली-वर झोके घेत आणि जमिनीवर उतरल्यावर आपली शेपटे जमिनीवर आपटीत हे चिमुकले पक्षी हिरवळीतून तुरूतुरू धावू लागले की, हिरवळीचा तजेला आणखीनच जाणवतो. राखी रंगाचे आणि पिवळ्या पोटाचे धोबी, काळे-पांढरे धोबी, पिवळ्या डोक्याचे, निळ्या डोक्याचे, काळ्या डोक्याचे धोबी; अशा धोबी पक्ष्यांच्या कितीतरी जाती थेट मे महिन्यापर्यंत आपल्या इथे वास्तव्य करून असतात.



ऑक्टोबरच्या सुरुवातीसच हिमालयातून ‘ कॉलर्ड बुशचॅट ’ हा आणखी एक मोहक रंगाचा पक्षी इथे येऊन दाखल होतो. पिवळट, नारिंगी रंगाचे आणि गळ्याभोवती पांढरी कॉलर असलेले चिमणीच्या आकाराचे हे पक्षी झुडुपांच्या टोकावर आणि टेलिग्राफच्या तारांवर बसलेले दिसू लागतात आणि ऑक्टोबरच्या शेवटी शेवटी सायबेरियातून ‘ लिटल स्टिंट ’ हे लहानसे पक्षी हजारो मैलांचे अंतर काटून तळ्याकाठी उतरतात; तर सोनेरी डोक्याचा आणि गडद-तपकिरी रंगाचा दलदल-ससाणा पंख पसरून संथपणे तळ्यावरून घिरट्या घालू लागतो. तो येतो पूर्व युरोपातून. ऑक्टोबर महिन्यात या पाहुण्यांच्या तैनातीत माझी फारच धांदल उडते. खूप खूप पाहुण्यांची तुम्हांला ओळख करून देणार आहे मी; पण त्यांपैकी पुष्कळांशी मात्र आता माझी चांगलीच गट्टी जमली आहे ! ठराविक दिवशी नेमकी हजेरी लावणारे आहेत ना ते ! एखादा दिवस मात्र असा उगवतो की, नवीनच चेहरा अनपेक्षितपणे भेटतो. गेल्या वर्षी ‘टर्नस्टोन’ असाच अवचित भेटला. युरोपातून येणारा हा सागरी पक्षी नेहमी आपल्याकडेही समुद्रकिनाऱ्यावरच मुक्काम करून असतो. पुण्याला त्याने धावती भेट का दिली, हे मलाही उलगडले नाही. आता यावर्षी असा कोण भेटतो ते पाहायचं !

✠ ✠



तीन

# डोंगरातील सवंगडी



मला दुरून डोंगर साजरे नाहीत. त्यांच्या कणखर, रुंद छाताडा-वर बागडायला मला फार आवडते. त्यांची आणि माझी जवळीक फार जुनी आहे. अनेक रूपात त्यांना मी पाहिलंय. कडक उन्हाने भाजून, करपून गेलेले, उष्णतेचे कढ देणारे डोंगर मी पाहिलेत, हरित पर्णांनी नटलेले, ढगांचे तलम वस्त्र लपेटून सृष्टिदेवीच्या सान्निध्यात स्वर्गीय आनंदाचा उपभोग घेणारे तृप्त डोंगर मी पाहिलेत; तसेच बारा हजार फूट उंचीवरच्या तपोवनात आपली शुभ्र जटाधारी मस्तके उन्नत ठेवून तपोमग्न असणारे डोंगरही मी पाहिलेत.

भव्य देहयष्टी, करारी पण स्थितप्रज्ञ मुद्रा आणि कोमल हृदय असलेले हे माझे मित्र फार प्राचीन कालापासून सृष्टीचे रक्षणकर्ते म्हणून प्रसिद्ध आहेत. पूर्वी त्यांनी संकटग्रस्त मानवाला आश्रय दिला. आता मात्र हातात बंदुका वागविणाऱ्या आणि विळा-कोयता घेऊन वृक्षवल्लींना धारेवर धरणाऱ्या मानवापासून निसर्गाचे– झाडांचे आणि पशु-पक्ष्यांचे– रक्षण करण्याचे अवघड काम डोंगरांना करावे लागत आहे. माझ्या कित्येक सवंगड्यांना भेटायला मला डोंगराकडेच धाव घ्यावी लागते.

एका सुंदर सकाळी मी डोंगराच्या पायथ्याशी पोहोचतो. पावसाळा नुकताच सरून गेला आहे. काळ्या-पांढऱ्या ढगांचे पुंजके आकाशात हिंडत असले तरी बऱ्याच दिवसांनी आकाशाची प्रसन्न निळाई आणि तीतून होणारी सोनेरी किरणांची बरसात मन उल्हसित करीत आहे. बाभळ-बन पिवळ्या फुलांनी बहरले आहे, साग पांढऱ्या-बदामी मोहोराने डवरले आहेत, निखाऱ्याची धग देणारी कळलावीची तांबडी-पिवळी फुले अजूनही कुठे कुठे दिसताहेत, तर हिरव्यागार गवतातून कुठे रानहळदीच्या जांभळ्या गुच्छाने डोके वर काढले आहे. तरारलेल्या भातशेतातून वाट काढीत रस्ता वळणावळणाने वर चढतो आहे. आजूबाजूच्या सृष्टि-सौंदर्याचा आस्वाद घेत मी सावकाश चालतो आहे आणि माझ्या-



पुढे वीस कदमांवर तांबडट, भुरकट मातीच्या रंगाचाच पक्षी तुरुतुरू धावतो आहे, मध्येच कसलासा दाणा टिपायला थबकतो आहे. मी फार जवळ येतो आहे असे दिसताच पंखांचा फटाफट आवाज करीत उडून रस्त्याकडेच्या खडीच्या ढिगावर जाऊन बसतो आहे.



त्याचे गुलाबी पाय, पांढरी किनार असलेली सुबक शेपूट, घाटदार बांधा, निळसर काळपट ठिपके असलेले पंख आणि मानेवरचा नक्षीपट न्याहाळत मी त्याचे छायाचित्र घेण्याचा प्रयत्न करतो आहे. या पक्ष्याचे नाव कवडा. गावात येणाऱ्या लालसर, लहान्या होल्याचा हा गावकरी बंधू. होल्याचा बांधा नाजूक, चालचलणूक अदबीची, काहीशी नखरेल. शहरी रीतीरिवाजाला जणू सरावलेली. त्या मानाने कवडा गांवढळ– पण दणकट, घोटीव बांधा असलेला. त्याच्या उडण्यात सफाई आहे, वेग आहे पण नखरा नाही. तो आहेच मुळी माळरानाचा, डोंगरउताराचा रहिवासी.

कवडा हा मात्र केवळ भारताचाच रहिवासी नाही. सिलोन, जावा-सुमात्रा, आग्नेय-आशियापासून थेट चीनपर्यंत त्याच्या निरनिराळ्या जाती पसरलेल्या आहेत. कवड्याचे घरटे म्हणजे थोड्या काटक्या एकत्र करून कसातरी बांधलेला खोलगट फलाट. नर-मादी दोघे मिळून हे घरटे बांधतात. नर त्या वेळी हवानृत्य करून मादीला खूष करतो. तो सरळ हवेत वर चढतो आणि पंख पसरून गिरक्या घेत खाली येतो. नर-मादी जन्मभर एकमेकांना सोबत करतात. असा हा सुंदर आणि गुणी पक्षी शिकाऱ्यांच्या बंदुकीला मात्र बऱ्याच वेळा बळी पडतो.

रस्ता सोडून आधी कोण बाजूला जाते, याची मी आणि कवडा यांच्यात शर्यत लागली होती. कवड्याने अजून रस्ता सोडला नव्हता. मी मात्र एकदम थबकलो. रस्त्याच्या कडेच्या बांधावर चढून पलीकडच्या आम्रवृक्षाकडे एकटक बघत राहिलो. आंब्याच्या डहाळीवर एक अत्यंत सुंदर पक्षी बसला होता. त्याचे डोके तांबडे होते, चोच पिवळी होती, अंग हिरवेगार होते, लांब शेपूट निळी होती आणि तिच्या कडेची पिसे पांढरी होती. डहाळीवरून खाली वाकून, शरीर उलटे करून कोत्रळा मोहोर पकडण्याचा त्याचा उद्योग चालला होता.

आपल्या पोपटाचा हा डोंगरातला भाऊ! साध्या पोपटाचे

सर्वच शरीर हिरवेगार आणि चोच तांबडी असते, तर हा रान-पोपट विविधरंगी आहे. त्याच्या अनेक रंगांमुळे त्याला पंचरंगी पोपटही म्हणतात आणि पिंजऱ्यातही ठेवतात. मात्र त्याचा आकार पोपटापेक्षा लहान आहे.

'टचूईऽऽऽ!' अशी शीळ घालीत या पोपटांचे थवे रानातून वेगाने उडताना दिसतात. उडताना ज्या सफाईने ते मध्ये आलेल्या फांद्या चुकवितात ती सफाई पाहून अचंबा वाटतो. कैऱ्या, रानफळे, सागाची फळे यांवर ते जगतात. नांगरलेल्या शेतात उतरून त्यातील कीटक आणि पेरलेले बीसुद्धा ते खातात. झाडाच्या ढोलीत त्यांचे घरटे असते. मादी रंगाला फिकट असून तिचे डोके निळसर-राखी असते. रानपोपट हा आपल्या डोंगरा-जंगलात आढळणाऱ्या पक्ष्यांमध्ये एक अत्यंत मोहक पक्षी आहे.

आपली लांब शेपूट ताठ मागे धरून वेगाने उडणारे रान-पोपटांचे थवे पाहत मी निम्माअधिक डोंगर चढून आलो. दम घेण्यासाठी जरा थांबलो आणि माझी दृष्टी आकाशाकडे गेली. पखांची लयबद्ध हालचाल करीत एक पक्षी हवेत एका जागी स्थिर राहण्याचे आपले कौशल्य प्रकट करीत होता. स्थिर राहून खालच्या जंगलाचा तसू न् तसू तो बारीक नजरेने न्याहाळीत होता. मध्येच पंखांचा उभा त्रिकोण करीत तो सावकाश खाली आला, एका झुडुपामागे गुप्त झाला आणि टोळासारखा मोठा कीटक चोचीत धरून एका फांदीवर येऊन बसला.

माझ्या नजरेत प्रथम भरले ते त्याचे लाल मण्यासारखे कांतिमान डोळे. बाकदार, पिवळट-काळी चोच, रुंद, पांढरेशुभ्र डोके, पांढरीच मान आणि छाती. काळे पंख आणि लांब शेपूट असलेला हा देखणा पक्षी आपल्या तीक्ष्ण नख्यांमध्ये सावज पकडून खात होता. काळ्या पंखांची ही घार आपल्या तपकिरी घारीपेक्षा आकाराने लहान, पण दिसावयास अधिक सुंदर आहे. डोंगर-उतार आणि माळराने यांवर तिचा पहारा असतो.

'सूंऽऽऽ' अशी गोड शीळ ऐकू आली म्हणून माझे तिकडे लक्ष गेले. मोठमोठ्या धोंड्यांतून आणि दाट झाडोऱ्यांतून वाट काढीत एक ओहोळ वाहत होता. तिकडूनच ही शीळ कानांवर येत होती. मी आवाज न करता तिकडे गेलो आणि झुडुपे हलकेच बाजूला करून समोर पाहिले. एका मोठ्या दगडावर शाईसारख्या गडद निळ्या रंगाचा, साळुंकीच्या आकाराचा एक पक्षी मान वाकवून माझ्याकडे पाहत असताना मला दिसला. माझी चाहूल लागताच हा बुजरा, लाजरा पक्षी 'सूंऽऽऽ' अशी शीळ घालीत पसार झाला.



निळ्याशार रंगाचा हा पक्षी पर्वत-कस्तुर या नावाने ओळखला जातो. त्याच्या शीळ घालण्याच्या सवयीमुळं त्याला 'शीळ घालणारा मुलगा' असेही म्हणतात. डोंगरावरून वाहत येणारे ओढे आणि ओहोळ ही त्याची निवासस्थाने. तिथंच एखाद्या झुडुपाच्या मागे किंवा उंच कपारीत त्याचे घरटे दडविलेले असते. हा गाणारा मुलगा आहे मात्र अतिशय भित्रा. त्याचे छायाचित्र घेण्यासाठी मला एके ठिकाणी सहा तास निश्चल बसून राहावे लागले होते.

ओहोळाच्या कडेकडेने वर चढत मी डोंगरमाथ्यावर येऊन दाखल झालो. तिथल्या गार वाऱ्याने माझा शीण कोठल्या कोठे पळाला. मी थर्मासमधल्या गरम चहाचा आस्वाद घेत बसलो असतानाच पक्ष्यांची एक जोडी शिवाशिवी खेळत माझ्यासमोरून उडत गेली. मागील पक्ष्याचे तांबडे पंख आणि तुकतुकीत काळे शरीर उन्हात चमकले. पुढचा पक्षी मात्र फिकट-तपकिरी रंगाचा होता. दोघांच्याही डोक्यावर तुरे होते. भारद्वाजाची छोटी आवृत्तीच असा हा तुरेवाला बंटिंग आपल्या डोंगरांचा रहिवासी आहे. जोडीने किंवा चार-पाच जणांच्या टोळीने हे पक्षी डोंगरां-वर बागडतात. हा बंटिंग आपले घरटे जमिनीवरच एखाद्या मोठ्या फत्तराच्या आड किंवा गवताच्या पुंजक्यात दडवितो. विणीचा हंगाम (मे ते ऑगस्ट) जवळ आला की नर पक्षी झाडा-झुडुपांच्या टोकावर उंच बसून सुंदर गाणे म्हणतो.

डोंगर-माथ्यावरून मी सभोवती अथांग पसरलेल्या सृष्टीकडे

नजर टाकली. उतारांवर गच्च रान माजले होते; कुठं दाट झुडुपे तर कुठे उंच वृक्ष. त्याखाली हारीने शेते दाटली होती. झाडा-झुडुपातून बागडताना पक्षी दिसत. शेते, फांद्यांवरून उड्या मारताना माकडं दिसत होती. या माझ्या उदारधी डोंगरमित्राने कितीतरी सवंगड्यांना आश्रय दिला होता, संरक्षण पुरविले होते. त्या विशाल शरीराच्या आणि उत्तुंग मनाच्या डोंगरावर हिंडताना याच विचाराने माझे मन भारावून गेले होते.

* *



चार

# मी पाहिलेले गरुड

मी पाहिलेला पहिला गरुड आता अगदी पुसट आठवतो. गावा-बाहेरच्या आमराईत पक्षी पाहण्यासाठी मी गेलो होतो. आंब्याला आलेल्या मोहोरातील मध चाखीत बागडणारे सूर्यपक्षी पाहता पाहता माझी नजर सहज निळ्या आकाशाकडे गेली. गडद तपकिरी रंगाचा एक मोठा पक्षी पंख पसरून घिरट्या मारीत असलेला मी पाहिला. प्रथम वाटले ती घार असावी; पण लगेच माझी नजर त्या पक्ष्याच्या शेपटीकडे गेली. शेपटी त्रिकोणी नव्हती, घारीच्या शेपटीसारखी मध्ये दुभंगलेली नव्हती. त्याचा आकारही मला घारीपेक्षा मोठा वाटला आणि गिधाड म्हणावे, तर मानेवर भरपूर पिसे होती. हा गरुड तर नसावा ? माझ्या अंगावर रोमांच उठले. मी घाईघाईने हातातील पुस्तक उघडले. त्यात उडत्या गरुडाचे चित्र दिले होते. चित्रातील गरुडाचे शेपूट आणि या पक्ष्याचे शेपूट यांत मुळीच फरक नव्हता. गरुडाची आणि माझी ही पहिलीच भेट. तो गरुड घिरट्या मारीत दूर गेला तरी मी कितीतरी वेळ आकाशात नजर लावून बसलो होतो.

पण या वेळी मी गरुड पक्षी ओळखला तरी तो कोणत्या जातीचा गरुड होता हे काही मला उलगडले नव्हते. एक गोष्ट मात्र मला कळून चुकली होती, की गरुड हा पक्षी लोक समजतात तितका काही दुर्मिळ नाही. काही लोक समजतात की गरुड फक्त हिमालयातच पाहायला मिळतो, तर काही म्हणतात की तो पाहण्यास दुर्गम पहाडात जावे लागते. हिमालयात आणि पहाडात गरुड राहतो हे खरे आहे; पण पुष्कळदा तो पुण्या-मुंबईसारख्या गजबजलेल्या शहरांजवळही येतो हेही खरे आहे.

गरुडाची मला पूर्ण ओळख प्रथम पटली ती पुण्याजवळच. पुण्याच्या पश्चिमेकडे पाषाणच्या तलावाभोवती पूर्वी बऱ्यापैकी झाडी होती. तिथल्या ज्या वडावर मी गरुड पाहिला तो वड अजूनही तेथे आहे. वडाच्या घनदाट छायेत एक मोठा पक्षी बसलेला मी दुरून पाहिला. दुर्बिणीतून पाहिल्यावर त्याच्या मस्तकावरील आखूड, पण गोलाकार तुरा, छातीवरील तांबुस



तपकिरी रंग व त्यावरील गडद ठिपके आणि रुंद शेपूट दिसले. मी जवळ येण्याचा प्रयत्न करताच तो उडाला आणि मला त्याच्या पंखाखालील रुंद पांढरा पट्टा दिसला. मला या गरुडाची ओळख आता पटली. तुरेवाल्या सर्प-गरुडास मी पाहिले होते.

सर्प हे या गरुडाचे आवडते भक्ष्य आहे. सर्प चावला तर त्याला त्याचे विष बाधत नाही असे नाही. तर सर्प पकडताना तो त्याला चावू देत नाही, हे त्याचे कौशल्य. हा गरुड आपल्याकडे डोंगरात आणि जंगलातून दिसतो. गड आणि किल्ले यांतून हिंडताना माथेरान-महाबळेश्वरसारख्या थंड हवेच्या ठिकाणी दुपारच्या वेळी आकाशात घिरट्या घालताना या गरुडांची जोडी नेहमी दृष्टीस पडते. त्यांनी घातलेली लांब शीळ पहाडकपारी दुमदुमून सोडते. पंखांच्या खालच्या बाजूचा पांढरा पट्टा दुरूनही आपल्याला दिसतो आणि या गरुडाची ओळख पटते. सरडे, बारीक पक्षी यांचीही तो शिकार करतो आणि त्यांच्या शोधार्थ कधी कधी तो शहरांच्या आसपासही फेरफटका मारून जातो.

मात्र भुरा किंवा तपकिरी गरुड हा अधिक धीट आहे. तो आकाराने सर्प गरुडापेक्षा मोठा आहे– जवळजवळ गिधाडाएवढा मोठा आहे हा पक्षी. रुंद शेपूट, भव्य मस्तक, अतिशय तीक्ष्ण आणि बाकदार चोच व भेदक नजर असलेला हा फिकट-तपकिरी अन् भुरकट रंगाचा गरुड अतिशय रुबाबदार दिसतो. त्याचे पाय पिसांनी पूर्णपणे झाकलेले असतात. हे त्याचे आणखी एक वैशिष्टच!

पण इतक्या सुंदर पक्ष्याच्या सवयी मात्र आपल्याला आवडण्या-सारख्या नाहीत. हा गरुड गिधाडांप्रमाणे मेलेल्या प्राण्याचे मास खातो, उकिरडे फुंकतो, टोळ, मुंग्या असले कीटक खातो आणि इतर पक्ष्यांच्या तोंडचा घास पळवायलाही कमी करीत नाही. घाण खाण्याच्या त्याच्या सवयीमुळेच तो मनुष्यवस्तीच्या आसपास पुष्कळदा दिसतो. पुण्याजवळ तर एका ठिकाणी या गरुडांनी वस्तीच केली होती. खाण्यासाठी मारण्यात येणाऱ्या कोंबड्यांची पिसे, हाडे वगैरे भाग इथे टाकून दिलेले असत. त्यांना चिकटलेले

मास खाण्यासाठी तपकिरी गरुडांचा फार मोठा समूह इथे जमलेला असायचा. एकदा तर या समूहात मी एकशेनव्वद गरुड मोजले. एका परकीय शास्त्रज्ञाला हा समूह पाहून फार अचंबा वाटला. असा प्रकार जगात अन्य कोठे आढळेल की नाही अशी शंका वाटली त्याला !

गरुडासारखा मासभक्षक व शिकारी पक्षी सहसा समूहाने आढळत नाही. उलट प्रत्येक गरुड आपल्या प्रदेशाचे रक्षण करतो. दुसऱ्या गरुडाला तो आपल्या प्रदेशात शिकार करू देत नाही. पण या ठिकाणी भक्ष्य विपुल प्रमाणात असल्यामुळे गरुडांना एकमकांशी स्पर्धा करण्याचे कारणच उरले नव्हते. सगळे गुण्या-गोविंदाने एकत्र राहत होते !

आणखीही एका गरुडाला मी शहराच्या आसपासच पाहिले. हा गरुड आकाराने लहान होता. साधारणपणे घारीएवढा. त्याचा रंग तांबूस तपकिरी होता. पण रुंद शेपूट, बाकदार चोच आणि त्याच्या पाठीमागे लागलेले कावळे यांवरून मला त्याची ओळख पटली– म्हणजे तो शिकारी पक्षी आहे हे कळले. अशा शिकारी पक्ष्यांना– गरुड आणि घुबड यांना– कावळे नेहमी सळो की पळो करून सोडतात. एकटा-दुकटा कावळा त्यांच्या वाटेस जायचा नाही. पण एकत्र जमून कावळे त्यांच्या पाठीस लागतात. कारण हे शिकारी पक्षी आपल्या पिलांची शिकार करतील, अशी भीती कावळ्यांना वाटते आणि ती खोटी नसते.

हा लहान गरुड स्थलांतरीत पक्षी आहे. तो पूर्वयुरोप किंवा सोव्हिएट युनियन अशा उत्तरेकडील प्रदेशांतून दर हिवाळ्यात आपल्याकडे येतो. लहान पक्षी, उंदीर, कीटक, टोळ यांवर तो आपली उपजीविका करतो आणि उन्हाळ्यात उत्तरेकडे परत जातो. या पाहुण्या पक्ष्याचे नाव आहे 'बूटेड ईगल'.

पण पक्षिराज ही पदवी ज्याला खरोखरी शोभून दिसेल असा गरुड कोणता असे विचाराल तर मी सांगेन 'पल्लस गरुड'. गडद काळपट, तपकिरी रंगाचा हा प्रचंड पक्षिराज घारीच्या



दुप्पट मोठा आहे असे म्हटल्यास फारसे चुकणार नाही. त्याच्या भव्य मस्तकावरची लांब सोनेरी पिसे त्याच्या पाठीवर रुळत असतात. ती पाहून वाटते की गरुडराजाने सुवर्णमुकुटच घातला आहे. त्याच्या रुंद शेपटीवर पांढरा आडवा पट्टा दिसतो. गुजरात, राजस्थान या भागांतील मोठी तळी आणि उत्तर भारतातील नद्यांची मोठी पात्रे यांवर हा पक्षी संचार करतो. हा मच्छिमार गरुड आहे. मासे आणि पाण्याजवळ आढळणारे लहान-मोठे पक्षी यांची तो शिकार करतो.

मी या पक्ष्याला अहमदाबादजवळच्या नळ सरोवराजवळ पाहिला. एका वृक्षावर बसून तो सरोवरावर नजर ठेवून होता. त्याचे छायाचित्र घेण्यासाठी मी सावकाश त्याच्या रोखाने पुढे सरकत होतो. तोही माझ्या हालचालींकडे बारीक लक्ष ठेवून होता. सुमारे शंभर फुटांवरून मी त्याचे एक छायाचित्र घेतले. पण पुढे जाण्याचा प्रयत्न करताच गरुडराजाने आपले विशाल पंख पसरून आकाशात झेप घेतली. त्याच्या वजनाने तो वृक्ष गदगदला. माझ्या तोंडून उत्स्फूर्तपणे उद्‌गार निघाला, 'आहे खरा पक्षिराज !'

* *



पाच

# गिधाड



सकाळी उठले की, माझी दृष्टी हल्ली आभाळाकडे लागते. माझीच कशाला, पावसाने यंदा फारच ताणून धरल्यामुळे उभा महाराष्ट्र आज आभाळाकडे डोळे लावून वरुणराजाची आराधना करण्यात गुंतला आहे. दृष्टी आभाळात पोचली की, आपले विस्तीर्ण पंख पसरून संथपणे घिरट्या मारणारे गिधाड कधी नजरेला पडते आणि परिस्थितीची भेसूरता मनाला जास्तच जाणवते.

गिधाड हा आहे मेलेल्या प्राण्यांचे मास खाणारा पक्षी. त्यामुळे गिधाड म्हटले की, मृत्यूचे भेसूर दृश्य डोळ्यांसमोर उभे राहिल्यास नवल नाही. दुष्काळ पडला आहे, अन्नपाण्याविना गुरे तडफडून मरत आहेत आणि त्यांना खाण्यासाठी गिधाडांचे थवे जमताहेत अशी दुष्काळी परिस्थितीची चित्रेही आपल्याला कधी कधी पहावयास मिळतात. गिधाड म्हटले की, सर्वसामान्य माणसाच्या मनात घृणा उत्पन्न होते, ती याचमुळे. पण निसर्गाच्या चौकटीत गिधाडालाही विशिष्ट स्थान आहे. निसर्गाने त्याच्याकडे एक कामगिरी सोपवलेली आहे. ती कामगिरी आहे : स्वच्छता राखण्याची. गिधाड आणि त्याचे कीटक व प्राणीवर्गातले जातभाई ही कामगिरी चोख बजावतात. नैसर्गिकरीत्या मेलेला पक्षी, प्राणी हा फार काळ तसाच राहिलाय, त्याचे प्रेत कुजून चालले आहे. दुर्गंधी सुटली आहे– असे कधी आढळायचे नाही. मुंग्यांसारखे कीटक, काही मासभक्षक प्राणी आणि गिधाडे त्याची केव्हाच विल्हेवाट लावतात. नैसर्गिक स्थितीत मेलेला प्राणी किंवा पक्षी आपल्या दृष्टीसही पडत नाही, इतकी हे स्वच्छता राखणारे प्राणी आणि पक्षी आपली कामगिरी चोख पार पाडतात !

गिधाडाला पाहिले नसेल, असा माणूस विरळा. शरीराचा प्रचंड आकार– लांबी सुमारे ७५ सेंमी– धडातून सरळ बाहेर निघालेली, पिसे नसल्यामुळे हिडीस दिसणारी लांब मान, बोडके डोके आणि मोठी, टोकाशी बाकदार असलेली चोच, असा त्याचा अवतार आहे. गावाच्या सीमेवरील मोठ्या वृक्षांच्या शेंड्यावर हा पक्षी हमखास



बसलेला दिसतो. कोणी मेलेले जनावर गावच्या वेशीबाहेर आणून टाकले की, हा-हा म्हणता कितीतरी गिधाडे त्याच्याभोवती जमतात. त्या मेलेल्या जनावराच्या मासावर कुत्री जर अगोदरच आलेली असली तर गिधाडे आजूबाजूला, जमिनीवर, झाडांवर शांतपणे वाट पाहत बसून राहतात. पण एकदा का गिधाडांचा थवा भक्षण करण्यास खाली उतरला की, त्यांना हुसकावून, त्यांच्या घोळक्यात शिरणे कुत्र्यांनाही जमत नाही.

मेलेल्याच नव्हे तर मरावयास टेकलेल्या जनावराचेही गिधाडे लचके तोडल्याशिवाय राहत नाहीत. भरतपूरच्या अभयारण्यात पक्षी पाहत हिंडत असताना मला एक विलक्षण प्रकार पाहावयास मिळाला. दलदलीत एक म्हैस बसलेली होती. दुरून ती जखमी आहे, असे काही ओळखू येत नव्हते. पण कसा कोण जाणे, तिच्या जखमेचा गिधाडांना सुगावा लागला असावा. कारण थोड्याच



वेळात दोन गिधाडे तिच्या आसपास उतरली. दबकत दबकत पुढे सरकत त्यांनी तिच्या जखमेवर चोच मारली व मांसाचा एक तुकडा तोडला. त्या विव्हल झालेल्या म्हशीने त्यांना हाकलण्याचा प्रयत्न केला, पण ती सतत तिची जखम टोकरत राहिली. अशी पाच-सहा मिनिटे गेली असतील आणि दुसऱ्या क्षणी आकाशातून विमाने उतरावीत, तशी एकापाठोपाठ एक गिधाडे तेथे उतरली. सुमारे दोनशे गिधाडांच्या घोळक्यात ती म्हैस दिसेनाशी झाली, ती कायमचीच ! तासाभरानंतर म्हशीच्या शरीराचा कोणताही अवशेष जाग्यावर उरला नव्हता.

आकाशात उंच घिरट्या मारीत असलेल्या गिधाडांना मृत प्राण्याचा सुगावा दूरवरून कसा लागतो, याचे कोडे अजूनही नीटसे उकललेले नाही. एकमेकांच्या हालचाली ते न्याहाळीत असावेत आणि एक जमिनीवर उतरलेला दिसला की, दुसरा त्याच्यामागे येत असावा. कदाचित कावळे, घारी आणि कुत्री यांच्या हालचालींवरूनही मृत प्राण्याचा पत्ता त्यांना लागत असावा. त्यांची तीक्ष्ण दृष्टी यासाठी उपयोगी पडते हे निश्चितच.

आपल्या शहराच्या व गावाच्या आसपास जी काळपट तपकिरी रंगाची गिधाडे दिसतात, ती पांढऱ्या पाठीची गिधाडे. ती पंख पसरून उडू लागली की, त्यांच्या पंखाखालचा आडवा, पांढरा पट्टा स्पष्टपणे दिसतो आणि जमिनीवर उतरली की, पंखातून पांढरी पाठ डोकावते. ही गिधाडे नेहमी झाडाच्या शेंड्यावर बसलेली आढळून येतात. ती थव्याने राहतात. रात्रीच्या वेळी ठराविक झाडांवर त्यांचे थवे वस्तीला जमतात. माझ्या कामावर जाण्याच्या वाटेवर काही प्रचंड वटवृक्ष आहेत. संध्याकाळी चाळीस-पन्नास गिधाडे त्यांच्या शेंड्यावर बसलेली मला रोज दिसतात. लहान आकाराचे, पांढरे पंख व पिवळी चोच असलेले सर्वाशनी गिधाडही गावाच्या आसपास दिसते.

डोंगराच्या कडे-कपारीत राहणारी गिधाडे ही लांब चोचीची गिधाडे होत. पांढऱ्या पाठीची गिधाडे कपारीत कधी घरटे

बांधणार नाहीत, नेहमी झाडाच्या शेंड्यावर बांधतील. तर लांब चोचीची गिधाडे झाडावर कधी आढळणार नाहीत, नेहमी कडे-कपारीतच घरटे बांधतील, वस्तीला येतील. गिधाडांमध्येही एक गिधाड रुबाबदार व बांधेसूद शरीरामुळे उठून दिसते. म्हणूनच त्याला 'किंग व्हल्चर' (शाही गिधाड) असे नाव पडले असावे. काळे शरीर आणि भडक तांबडी मान, यामुळे हे गिधाड दुरूनही ओळखू येते. मात्र हा पक्षी दुर्मिळ आहे, सहसा दिसत नाही, थव्याने राहत नाही, एकेकटा किंवा जोडीनें दिसतो.

हिमालयातील ग्रिफॉन गिधाड हे आकारानें सर्वांत मोठे गिधाड होय. त्याच्या शरीराची लांबी जवळ जवळ १०० सेंमी भरते. सिमला, नैनिताल वगैरे थंड हवेच्या ठिकाणी खाकी रंगाचे जे गिधाड दिसते, तेच ग्रिफॉन गिधाड. या प्रचंड गिधाडांचा थवा जवळून गेला तर खरोखरच लहानसे विमान गेल्यासारखा आवाज येतो. हिमालयात अतिउंचावरही ही गिधाडे लीलया उडताना दिसतात. हिमालयात आढळणारे लॅमरगीयर हे दुसरे एक गिधाड आकाराने लहान असले, तरी त्याच्या पंखांची लांबी २०० सेंमी पेक्षाही जास्त भरते. हाड चोचीत धरून उडायचे, उंचावरून ते खाली दगडावर टाकायचे आणि त्याचे तुकडे होईपर्यंत हीच गोष्ट पुन्हा करायची, अशी लॅमरगीयरला सवय आहे.

एकूण काय, सगळीच गिधाडें सारखी नसतात. पण कामावरून सायंकाळी परतताना शेंड्यावर बसलेला गिधाडांचा थवा दिसला की उद्या पाऊस पडला तर बरे होईल, असा विचार मनात आल्यावाचून राहत नाही!

* *



सहा

# वेडा राघू

पुण्यातील लॉ कॉलेज टेकडीच्या पश्चिम उतारावर मी पुष्कळदा जाऊन बसतो. सायंकाळ झालेली असावी, क्षितिजावरील टेकड्यांच्या रांगेमागे सूर्य हलके हलके डुबताना दिसावा आणि अवचित ट्रिन् ट्रिन् ट्रिन् असा मंजुळ निनाद करीत चिमुकली विमाने आकाशातून खाली खाली यावीत, मावळत्या सूर्यकिरणांनी त्यांचे पंख क्षणभरच तेजाळावेत आणि मंद गिरक्या घेत ती चिमुकली विमाने समोरच्या झाडावर विसावावीत. दुसऱ्या क्षणी ते निष्पर्ण झाड तजेलदार हिरव्या-पोपटी पानांनी हसू लागावे.

टेकडीने अंधाराचा काळा चष्मा चढवण्यापूर्वी काही क्षणच हे दृश्य पाहायला मिळते आणि तेवढ्याचसाठी पश्चिम उतारावर मी पुष्कळदा येऊन बसतो.

आता, वेडा राघू हे नाव या चिमुकल्या, हिरव्या पक्ष्यांना कोणी दिले, हे मला माहीत नाही; पण ज्याने दिले त्याच्या अरसिकपणाची मला कीवच करावीशी वाटते! राघूसारखा त्याचा रंग हिरवागार आहे, हे खरं. पण त्याचा मंजुळ आवाज, नाजूक बांधा, उडण्यातील सफाई आणि चापल्य, तारेवरून एखाद्या कीटकाच्या मागे जाऊन त्याने हवेतल्या हवेत केलेल्या कसरती पाहिल्या की कोणी त्याला वेडा म्हणेल, असे स्वप्नात-सुद्धा वाटणार नाही.

ताज्या गवताच्या रंगाचा अंगरखा चढवलेल्या या सुंदर पक्ष्याला पाहिलेय का तुम्ही? तुम्ही प्रवासात असलात तर रस्त्याकडेच्या तारांवर अंतराअंतराने बसलेले हे पक्षी हमखास दिसतील. बागेत पुष्कळदा कुंपणावर येऊन बसतील. शेतांतल्या बांधावर बसलेले आढळतील, गवताच्या काडीवर बसून झोके घेतील, माळरानात खुरट्या झुडुपातून हिंडतील आणि रात्री आसपासच्या प्रदेशातून लहान लहान टोळ्या एकत्र एखाद्या झाडावर वस्तीला येतील. आपल्या देशात सर्वत्र, नेहमी आढळणारा असा हा पक्षी— वेडा राघू.

साधारण चिमणीएवढ्या आकाराच्या या पक्ष्याचा एकंदर रंग हिरवा असला तरी त्याच्या डोक्यावर आणि मानेवर लालसर रंगाची झाक दिसते. खाटिक पक्ष्याप्रमाणे याच्याही चोचीच्या शेवटापासून डोळ्यांच्या मागे एक काळा पट्टा गेलेला असल्याने बेटाचा माणकासारखा लालचुटुक डोळा चटकन दिसतच नाही. त्याच्या गळ्यापाशी काळ्या मण्यांची माळ रेखावी, तसे काळे कडे असते, तर पंखांवर निळी झाक मारते. त्याच्या शेपटीची मधली दोन पिसे लांब असतात. लांब शेपूट आणि तशीच लांब व कमानदार चोच असलेला हा पक्षी पंख पसरून हवेत उडू लागला की, खरोखरच छोट्याशा विमानासारखा दिसतो आणि त्याच्या मस्तकावर सूर्यकिरण पडले की तिथला नारिंगी रंग असा झळकतो की, वाटावे याने रत्नजडित मुकुटच घातलाय.

कुंपणाच्या किंवा टेलिग्राफच्या तारांवर बसायचे आणि हवेत उडणाऱ्या कीटकावर झडप घालून, त्याला चोचीत पकडून एक गिरकी घेऊन पुन्हा तारेवर येऊन बसायचे, असा या स्वारीचा उद्योग चाललेला असतो. कीटक पकडून आणला की इकडेतिकडे पाहत, त्याचा चेंदामेंदा करीत सावकाश त्याला गट्टम करायचे आणि पुन्हा तारेवर बसून झोके घ्यायचे.

दिवसाउजेडी तारेवर बसलेले हे पक्षी नेहमीच दिसतात. पण एकदा भल्या पहाटे, झुंजूमुंजू झाल्यावेळीही हे सहा-सात पक्षी तारेवर बसलेले मला दिसले होते. थंडीचा कडाका पडला होता त्यामुळे एकमेकांना अगदी बिलगून बसले होते ते. आपल्याकडे नेहमी आढळणारा हा वेडा राघू थेट इजिप्तपासून चीनपर्यंत आढळतो. याच्यापेक्षा आकाराने थोडा मोठा, गळ्यावर आणि छातीवर नारिंगी रंग आणि शेपूट निळे असलेला वेडा राघू पुष्कळदा पाण्याच्या सन्निध आढळतो. पुण्याच्या परिसरात मी या निळ्या शेपटीच्या वेड्या राघूला फक्त एकदाच पाहिले. पावसाळ्याच्या सरत्या दिवसांत कात्रज तलावाजवळ दोन जोड्या मी पाहिल्या. त्यानंतर मात्र मला ते पक्षी कधी आढळले नाहीत. काश्मीरमध्ये आढळणारा वेडा राघू ही या पक्ष्याची युरोपीय

जात आहे. या युरोपीय वेडचा राघूचा गळा पिवळा आणि छाती व पोट निळे असते. आपल्या देशाच्या पूर्वभागात, हिमालयाच्या पायथ्याच्या तराईत आणि मलबारमध्ये जी आणखी एक जात आढळते, तिचाही गळा पिवळा आणि डोळे व मान लालसर–तपकिरी असते. हिमालयातील जंगलात आढळणाऱ्या आणखी एका वेडचा राघूचे कपाळ, गळा आणि छाती निळे असतात. त्याचे पोट आणि शेपूट हिरवट तपकिरी असते आणि आकारानेही तो मोठा, म्हणजे जवळजवळ मैनेएवढा असतो.

वेडचा राघूचे घरटे झाडावर सापडायचे नाही बरे का! ते असते नदीकाठच्या किंवा ओढ्याकाठच्या दरडीत खोदलेले. छोटासा बोगदाच असतो तो. त्याच्या शेवटी खोलगट जागा केलेली असते आणि तिथे पक्षीण चार ते सात पांढरी स्वच्छ अंडी घालते. फेब्रुवारी ते जून हा त्यांचा अंडी घालून पिले वाढवण्याचा हंगाम.

तसे म्हटले तर वेडा राघू आपल्या अवतीभवती नेहमीच दिसतो. पण त्याला पाहण्याची माझी आवडती वेळ म्हणजे संध्याकाळच. निळ्या आकाशात वाऱ्यावर संथपणे तरंगत उडणारी, मध्येच पंख फडफडावीत मग पंख पसरून स्थिर होणारी, कोवळ्या सूर्यकिरणांत चमचमणारी ती चिमुकली विमाने दिसली की, माझे भान हरपते आणि त्यांचे थवे त्या झाडावर जमा झाले आणि हिरव्या झुबक्यांनी ते झाड बहरून गेले की, मनसुद्धा आनंदाने फुलून जाते.

* *



सात

# सहेली

मोठ्या आनंदी होत्या त्या मैत्रिणी. नेहमी घोळका करून जायच्या; एकमेकीला कधी विसंबायच्या नाहीत; आणि हा घोळका हसत-खिदळत, मोठ्या आनंदाने इकडे-तिकडे हिंडायचा. एक दिवस सकाळी उठून पाहावे तर गाणी गुणगुणत स्वाऱ्या लगबगीने चाललेल्या दिसत; दुसऱ्या दिवशी आपल्याच नादात– प्रत्येकजण उद्योगात गढून गेलेली दिसे. या आनंदी, उद्योगी चमूचे मला फार कौतुक वाटायचे. त्यांचे आणि त्यांना ‘सहेली’ हे नाव देणाऱ्याचे. आदर्श मैत्रिणी असाव्यात तर अशा !

माझ्या या चिमुकल्या मैत्रिणींना तुम्ही कधी पाहिले आहे की नाही ? पाहिले नसेल तर जरूर पाहून या. जशा गुणी तशाच रूपाने देखण्या आहेत त्या ! मात्र गावातील भाऊगर्दीत, गजबजाटात त्या भेटणार नाहीत तुम्हांला ! गावाबाहेर पडा, हिरव्या माळरानात, बाभूळवनात किंवा डोंगरउताराकडे पाऊल उचला. निळ्या डोंगरावरून येणाऱ्या गार वाऱ्याने तुमचे कान भरले की त्या झुळकेबरोबर येणारी स्वीऽऽट, स्वीऽऽट अशी गोड लकेर तुम्हांला रोमांचित करील आणि पाठोपाठ वाऱ्यावर तरंगत येणारा हा मैत्रिणींचा घोळका तुम्हांला सामोरा येईल. कधी त्या वाऱ्यावर हेलकावे खात तुम्हांला हलकेच अभिवादन करून पुढे जातील, तर काही वेळा तुमच्या आसपास घोटाळतील, बाजूचे झाड न् झुडूप बारकाईने तपासतील, या वेळी ह्या उद्योगात अगदी गढून गेलेल्या दिसतील. तुमच्याकडे लक्षही जाणार नाही त्यांचे.

त्यांच्या रूपाचे वर्णन काय करावे ? देह चिमणीपेक्षा लहानसा, शेपूट मात्र लांबसडक; शेपटीच्या वरच्या भागावर आणि पंखां-वर तांबड्या रंगाचे शिडकावे; छाती लालभडक तर डोके आणि बाकीचे शरीर काळपट–राखी; हे झाले नर-पक्ष्याचे वर्णन. मादी दिसायला अशीच. फक्त तांबड्या रंगाच्या जागी तिच्या पिसांना पिवळा रंग. ‘स्वीऽऽट’, ‘स्वीऽऽट’, असं गोड-गोड बोलत इकडे तिकडे भटकणे हा यांचा स्वभावधर्म. या आनंदी पक्ष्याला इंग्रजीत



म्हणतात मिनिव्हेट आणि हिंदीत त्यांना मोठे समर्पक नाव आहे ‘सहेली’. म्हणजे मैत्रीण !

गोंडस-गोजिरा असा हा चिमुकला पक्षी आपल्या हिंदुस्थानात सर्वत्र आढळतो. श्रीलंका, आग्नेय आशिया व दक्षिण चीन यांमध्येही त्याच्या निरनिराळ्या उपजाती दृष्टीस पडतात. वृक्षां-वर आढळणारे लहानसहान कीटक, अळ्या हे त्यांचे मुख्य खाद्य. त्यामुळे जिथे झाडे नसतील तिथे, म्हणजे दाट मनुष्यवस्तीच्या भागात हे पक्षी दृष्टीस पडणार नाहीत. मोठ्या बागांतून मात्र ते येतात आणि हिरव्यागार पर्णराशींमधून हिंडणारा हा लाल पक्षी मन चटकन वेधून घेतो.

गेली दोन वर्षे माझ्या आवडत्या डोंगरावर या मिनिव्हेटच्या आणखी एका जातभाईशी माझी दोस्ती झालीय. तशी आमची भेट अचानकच झाली. पावसाची सर आली म्हणून मी एका झाडाखाली उभा राहिलो. वरून हलक्या आवाजात गाण्याची गोड लकेर ऐकू आली म्हणून पाहिले तर काळ्या-पांढऱ्या रंगाचा एक चिमुकला पक्षी वरच्या फांदीवरून साद घालीत होता. त्याचे डोके काळे आणि छाती लालभडक होती. इतक्यात त्याच्याच-सारखा, पण रंगाला फिकट असा आणखी एक पक्षी तिथे आला. ही अर्थातच सहेलींचीच जोडी होती. पोट पांढरे असलेली ही सहेली खरीखुरी डोंगरची मैना आहे, गावात चुकूनसुद्धा आढळायची नाही. बाकी स्वभाव तसाच आनंदी, खेळकर. आताच पाहा ना, मी झाडाखाली उभा आहे तोपर्यंत बाजूच्या झुडुपांतून टुण्टुण् उड्या मारीत दोघे शिवाशिवी खेळली. गवताच्या पात्या-वर बसून झोका घेणे झाले आणि या दगडावरून त्या दगडावर उड्या मारण्याचा, ‘बघू कोण लांब उडी मारतो !’ हा खेळही झाला. मधूनच दोघं पाच-सात मिनिटं गायब व्हायची आणि चोचीत चांगल्या रसाळ अळ्या घेऊन परत यायची. मी थांबलो होतो तिथेच त्यांचे चिमुकले घरटे होते. घरटे म्हणजे एक छानसा, घाटदार पेला. लिंपून भिंती गुळगुळीत केलेल्या. पण आकार

इतका लहान की फांदीपासून वेगळा हुडकून काढायला येणे कठीण !

गेल्या वर्षी ज्या ज्या वेळी मी डोंगरावर फिरायला जाई त्या त्या वेळी त्यांच्याकडे जायला विसरत नसे. त्यांचा सुखी संसार पाहून माझे डोळे निवत. या वर्षीही पावसाळ्यात मी त्या झाडा-जवळ मोठ्या अपेक्षेने गेलो. पण ते घरटे तिथे दिसले नाही आणि माझ्या पोटात धस्स झाले. पण इतक्यात वाऱ्याबरोबर तरंगत तो ओळखीचा सूर माझ्या कानांवर आला आणि माझ्यापासून सुमारे पन्नास कदमांवर एका गवताच्या पात्यावर बसून झोके घेणारी काळी-पांढरी सहेली मला दिसली. 'नवीन बिऱ्हाड केलेलं दिसतंय बेटचांनी !' मी मनाशी म्हणालो आणि समाधानाने परत फिरलो.

* *



आठ

# जलकपोत

पावसाळ्याचे दिवस होते. पाऊस भुरभूर पडत असला तरी मी तळ्यावर जाण्याचे ठरवले. तळे अजून तुडुंब भरले नव्हते, पण तळ्याभोवतीचा माळ हिरवागार झाला होता. बाभूळबन चिमुकल्या पिवळ्या फुलांनी डवरले होते. बनातून पावशाचा 'पेरते व्हा !' 'पेरते व्हा !' असा स्वर आणि कारुण्य-कोकिळेची करुण-साद सतत ऐकू येत होती. कोवळ्या, लुसलुशीत गवतात घोडे आणि गुरे मजेत चरत होती आणि त्यांच्या खुरांनी बिचकलेले कीटक पकडण्यासाठी पांढरेशुभ्र बगळे त्यांच्या अवतीभवती तुरूतुरू धावत होते.

मी तळ्यावर पोचलो आणि पाऊस उघडला. ढग विरळ झाले. त्यांच्या सोनेरी पाकळ्या उमलल्या आणि त्यांतून रेशमी सूर्य-किरण हलकेच वातावरणात उतरले. त्यांनी हिरव्या गवताला झळाळी दिली, डोंगरावरून निळे बोट फिरवले आणि जागोजाग प्रकाशाचे पट्टे रेखले. अशा एका प्रकाशरेखेतच मला ती आकृती दिसली. तिथे तळ्याचा एक हात गवतावर हलकेच विसावला होता. परावर्तित प्रकाशामुळे पाणी विलक्षण चमचमत होते आणि त्या रुपेरी शलाकेतून हलकी पावले उचलीत एक डौलदार पक्षी चालत होता.

लांबसर, किंचित वाकडी मान आणि धनुष्याकृती शेपूट यांमुळे कमलपक्ष्याला जशी प्रमाणबद्धता आणि डौल लाभला आहे, तसा तो इतर पक्ष्यांमध्ये क्वचितच सापडेल. पण हे लावण्य त्याला फक्त उन्हाळ्याच्या अखेरीसच प्राप्त होते. गंमत अशी की विणीच्या हंगामात नर आणि मादी या दोघांनाही कमानदार शेपूट फुटते, मानेवर लंबवर्तुळाकार पिवळा ठिपका उमटतो आणि पाठीवरच्या व पोटावरच्या तपकिरी पिसांना तुकतुकीतपणा येतो. पक्ष्यांच्या इतर जातींमध्ये प्रामुख्याने नर पक्ष्यांनाच सुंदर पिसारा फुटतो. त्याचा उपयोग ते मादीला आकृष्ट करून घेण्यासाठी करतात. पण कमलपक्ष्याचे सारेच निराळे. नर आणि मादी दोघांनाही सुंदर साज चढतो. मादी अंडी घालते, तर ती उबवणे आणि पिलांची जोपासना करणे ही जबाबदारी नर उचलतो.



लांब, कमानदार शेपटीचे हे सुकाणू कमलपक्ष्याला पाण्यावर तरंगत असलेल्या वनस्पतींवर चालण्यासाठीही उपयोगी पडत असावे. त्याच्या पायाची भली लांबसडक बोटेही त्याला याचसाठी उपयोगी पडतात. कमळाच्या पानांवर अलगद पावले टाकीत, तोल सांभाळून चालणारा पक्षी म्हणून तर त्याला कमलपक्षी हे नाव पडले आहे. त्याचे घरटेही असे तरंगते असते आणि वाऱ्या-बरोबर इकडेतिकडे वाहतही जाते. कमळाच्या पानांवर, जल-वनस्पती, गवत यांचा ढिगारा रचून त्यात कमलपक्षी चार, गडद तपकिरी रंगाची अंडी घालतात. चोवीस-पंचवीस दिवसांनी त्यातून पिले बाहेर पडतात आणि जलवनस्पतींमध्ये निःशंकपणे बागडतात.

कमलपक्षी तसा लाजाळू, भित्रा पक्षी नाही. सर्वसाधारणपणे माणसाची चाहूल लागताच, तो उडून जाऊन पाण्याच्या मध्यभागी जाऊन बसेल हे खरे– असा तो बसला म्हणजे दुरून छोटया नौकेसारखा डौलदार दिसतो– पण सावकाश, त्याला न दचकवता गेलात तर तो तुम्हाला जवळही येऊ देईल. त्याचे छायाचित्र घेण्यासाठी मी असा दबकत दबकतच गेलो. उंच वाढलेल्या गवताच्या पुंजक्यांमागे मी माझी हालचाल शक्यतो लपवीत होतो. मी पहिले छायाचित्र घेतले, तेव्हा त्याची पाठ माझ्याकडे होती. दुसरे छायाचित्र घेण्यासाठी मी आणखी जवळ सरकलो, त्या वेळी तो गवतातला किडा टिपण्यासाठी वळला. कॅमेऱ्याचा आवाज ऐकून मात्र तो दचकला आणि तुरूतुरू धावत पाण्याच्या रोखाने गेला. काठाशी तो किंचित थबकला. एवढ्यात एक म्हैस आमच्या दोघांच्या मध्ये आली. तिच्या दोन पायांमधून तो माझ्याकडे पाहत असतानाच मी आणखी एक छायाचित्र टिपले.

पावसाळा सरत आला की, मात्र कमलपक्ष्याचे कमानदार शेपूट गळून पडते. त्यांच्या पिसांवरची तकाकी जाते. मानेवरचा पिवळा ठिपकाही फिकट होतो. वैभव गेलेले हे बापुडवाणे पक्षी मग लहान लहान टोळकी करून आणि तळ्याकाठच्या, लांब वाढलेल्या गवतामधून, दलदलीतून लपून छपून राहतात.

* *



नऊ

# जलाशयावरील पक्षी



गेल्या हिवाळ्यात मी भरतपूरला गेलो होतो. भरतपूर हे राजस्थानच्या सीमेवरील गाव मथुरा आणि आग्रा या दोन्ही शहरांना जवळ आहे, पश्चिम रेल्वेच्या मुंबई-दिल्ली या मार्गावरील एक स्टेशन आहे. बहुतेक सर्व गाड्या येथे थांबतात. भरतपूर दोन गोष्टींबद्दल प्रसिद्ध आहे. पहिली म्हणजे तेथील किल्ला व मंदिरे आणि दुसरे म्हणजे जवळचे घना पक्षी अभयारण्य. घना पक्षी अभयारण्य हे परदेशी प्रवाशांचे भारतातील एक प्रमुख आकर्षण आहे. त्यामुळे भरतपूरची साऱ्या जगभर प्रसिद्धी झालेली आहे. दिल्लीत येणारे बडे परदेशी पाहुणे भरतपूरला भेट देण्यास सहसा चुकत नाहीत.

भरतपूरला भेट देण्यात माझाही उद्देश पक्षी अभयारण्य पाहणे हाच होता. गाडीतून उतरल्याबरोबर टांगा ठरवून मी तत्काळ तिकडेच निघालो.

भरतपूर हे गाव खोलगटीत वसलेले आहे. त्यामुळं या विस्तृत खड्डयात जागोजागी पाणी साचते. उथळ पाण्याने भरलेले हे जलाशय पक्ष्यांचे आवडते. कारण या उथळ पाण्यातील चिखलात, त्यावर तरंगणाऱ्या वनस्पतींत त्यांना त्यांचे खाद्य भरपूर सापडते. घना अभयारण्य म्हणजेही असे मोठे, उथळ जलाशयच. त्यामधून हिंडण्यासाठी जागोजागी भर टाकून व बंधारे बांधून वाटा तयार केलेल्या आहेत. जलाशयातील उथळ पाण्यात बाभूळ, कदंब वगैरे वृक्ष आहेत. या वृक्षांवर हजारो पाणपक्षी घरटी बांधतात. भरतपूरइतके पक्षी एका जागी तुम्हांला क्वचितच पाहावयास सापडतील. पक्ष्यांच्या किलबिलाटाने, कलकलाटाने आणि आरवण्याने हा आसमंत दुमदुमून निघालेला असतो.

उन्हाळा संपत आला की, पाणपक्षी अरण्यात जमू लागतात. तीन-चार जातींचे बगळे, पांढऱ्या मानेचा, काळ्या मानेचा, उघड्या चोचीचा आणि रंगीत असे चार प्रकारचे करकोचे; छोटे आणि मोठे असंख्य पाणकावळे, सर्पपक्षी, स्पूनबिल म्हणजे चमचा पक्षी, सारस; आणि दोन-तीन जातींची स्थानिक बदके असे



तऱ्हेतऱ्हेचे सुंदर पक्षी घरटी बांधण्यासाठी अभयारण्यात येऊ लागतात. पुष्कळ वेळा या येणाऱ्या पक्ष्यांनी भरतपूरचे रेल्वे स्टेशनही गजबजून जाते, असे भरतपूरचे रहिवासी सांगतात. जणू यात्रेसाठी यात्रेकरूंचीच गर्दी जमली आहे. आलेले नर-पक्षी आपापल्या घरट्यांसाठी जागा शोधतात. या वेळी जागा मिळवण्या-



साठी त्यांच्यात भांडणे होतात. स्पर्धा लागते. प्रत्येकाला जागा मिळतेच असे नाही. ज्यांना जागा मिळते, ते आपली सहचारिणी शोधू लागतात. या वेळी पक्ष्यांची वर्तणूक मोठी पाहण्यासारखी असते. मान उंच करून, शरीर फुलवून, आपल्या पिसाऱ्यातील सर्वांत रंगीत किंवा शानदार भागाचे प्रदर्शन करून प्रत्येक नर-पक्षी मादीला आकृष्ट करून घेण्याचा प्रयत्न करीत असतो. यावेळचे सारस पक्ष्यांचे नृत्य तर पाहण्यासारखे असते. ते पाहण्यास मिळावे म्हणून पक्षी निरीक्षक जंग जंग पछाडतात.

ज्या नर-पक्ष्याला घरट्यासाठी एखादी जागा मिळवण्यात यश आलेले असते, अशाकडेच मादी आकृष्ट होते. नर-मादीची जोडी जमली की, दोघे मोठ्या उत्साहाने घरटे बांधण्याच्या कामाला लागतात. गेल्या वर्षी पक्ष्यांनी बांधलेली कित्येक घरटी अजूनही जशीच्या तशीच असतात. त्यांची डागडुजी मग सुरू होते. नर-पक्षी काटक्या गोळा करून मादीला त्या मोठ्या प्रेमाने नजर करतो. ती त्याच्या चोचीतून काटकी काढून घेऊन घरट्यात योग्य जागी बसवते. या वेळी पक्षी एवढ्या उत्साहाने कामात गढलेले असतात, इतकी त्यांची ये-जा चालू असते की, घना अभयारण्याला मुंबईच्या गजबजाटाचे स्वरूप यावे. पक्ष्यांच्या आपसातील झुंजीही सुरू असतातच. ज्यांना जागा मिळालेली नसते, ते इतरांच्या जागा बळकावण्याचा सतत प्रयत्न करीत असतात. मग चोचींची खणाखणी, धाकदपटशा, एकमेकांच्या अंगावर धावून जाणे हे प्रकार चालूच राहतात. मात्र झुंज निकराला क्वचितच पोचते.

एकेका बाभळीच्या झाडावर किंवा तसल्याच दुसऱ्या मोठ्या झाडावर कित्येक पक्ष्यांची घरटी आढळतात. बगळे, करकोचे, पाणकावळे, सर्पपक्षी हे समूहाने राहणारे आहेत. घरटीही ते एकमेकांच्या जवळच बांधतात. पिलांच्या व अंड्यांच्या रक्षणा-साठी इतर पक्ष्यांच्या सान्निध्याची मदत होते. त्यातूनही ससाणे, घारी, कावळे, गरुड असे मांसभक्षक अंडी आणि पिले पळवतातच. जवळपास टपूनच बसलेले असतात हे पक्षी. सारस, काळ्या

मानेचा करकोचा हे पक्षी मात्र समूहानें राहत नाहीत. दलदलीच्या भागातच गवत, काटक्या, वनस्पती यांचा एक ढिगारा करून सारस पक्षी घरटे तयार करतो; तर काळ्या मानेचा करकोचा आपले घरटे वृक्षाच्या शेंड्यावर बांधतो. अभयारण्यात दोन सुप्रसिद्ध कदंब वृक्ष आहेत. एका कदंबावर मच्छिमार गरुडाचे घरटे आहे; तर दुसऱ्यावर काळ्या मानेच्या करकोच्याचे. या दोन्ही घरट्यांचे धनी माझ्या चांगले परिचयाचे झाले होते. दुपारच्या शांत वेळी गरुडराज आकाशातून आपल्या घरट्यावर फेऱ्या घालायचे आणि त्यांचा चीत्कार आसमंतात दुमदुमायचा. तर सूर्य बुडायच्या बेतास आपल्या प्रचंड पंखांची उघडझाप करीत काळ्या मानेच्या करकोच्यांची जोडी घरट्यातून बाहेर पडायची.

पाणकावळा आणि सर्पपक्षी हे घना अभयारण्यातील संख्येनें सर्वांत जास्त असलेले पक्षी. कोठेही नजर टाका– पंख पसरून ते वाळवीत बसलेले पाणकावळे आणि आपली लांब मान तुमच्याकडे वळवून प्रश्नार्थक नजरेने तुम्हांला न्याहाळणारे सर्पपक्षी, तुम्हांला दिसल्याशिवाय राहणार नाहीत. हे दोघेही मासे पकडण्यात मोठे पटाईत आहेत. पाण्याखाली वीस-पंचवीस फूट जाऊनही ते मासे पकडून आणतात. मासा पकडायचा, तो हवेत उडवून तोंडाकडून झेलायचा व गट्ट करायचा असा यांचा उद्योग सतत चालू असतो.

दुपारच्या वेळी गिधाडे आणि गरुड यांच्याबरोबरच रंगीत करकोच्यांसारखे प्रचंड आकाराचे पक्षीही हवेच्या झोतावर स्वार होऊन आकाशात खूप उंच जातात. या वेळी पाणकावळे, सर्पपक्षी, बगळे, बदके घोळके करून एखाद्या वृक्षाच्या छायेखाली विश्रांती घेत पहुडलेली आढळतात. सायंकाळी ही मंडळी पुन्हा थोडा वेळ भक्ष्य शोधण्यात मग्न झालेली दिसतात. पण उन्हे कलली, सूर्य क्षितिजाला भिडण्याच्या बेताला आला की हजारो पक्ष्यांचे थवे, घनाच्या दिशेने निघालेले दृष्टीस पडतात. जितके पक्षी अभयारण्यात राहतात, तितकेच तिथून रोज बाहेर पडतात आणि वस्तीला परत अभयारण्यात येतात. घना अभयारण्य हे खरोखरी



पक्ष्यांचे महानगर आहे.

आता अंधार झपाट्यानें वाढतो आहे. निशाचर पक्षी नुकतेच जागे झाले आहेत. घुबडाचा घूत्कार, पिंगळ्याचा चीत्कार ऐकू येतो आहे; इतर सारे पक्षी मात्र झोपी गेले आहेत. आपलीही पावले निवासाकडे वळत आहेत.

* *

दहा

# निसर्गातील रंगपंचमी



निसर्गाची रंगपंचमी सुरू झाल्याची जाणीव त्या दिवशी अचानक मला झाली. जानेवारीचा पहिला-दुसरा आठवडा असावा तो. पक्षी पाहण्यासाठी मी अगदी सकाळीच बाहेर पडलो होतो. थंडी चांगलीच जाणवत होती. सूर्याची पहिली किरणे पसरू लागली, पण टेलिग्राफच्या तारांवर बसलेल्या हिरव्या वेडचा राघूंच्या चमूला अजून चेतना आली नव्हती. एकमेकांना अगदी बिलगून बसले होते ते. बहुतेक झाडांची पाने आता गळून गेली होती. त्यामुळे डोंगरउतार, माळराने किंचित भकास वाटत होती. पाने नसल्यामुळे पक्षी पाहणे मात्र अगदीच सुकर झाले होते. सलइच्या पांढऱ्या निष्पर्ण फांद्यांवर येऊन बसणारे पंचरंगी पोपट, भारद्वाजाची छोटी आवृत्तीच असे तुरेवाले बंटिंग,पांढऱ्या शरीराची, पण काळ्या पंखांची घार– असे दिमाखदार पक्षी पाहत मी हिंडत होतो. इतक्यात एका वृक्षाकडे माझे लक्ष गेले आणि निसर्गाची रंगपंचमी आता सुरू होणार या जाणिवेने अंगावर रोमांच उभे राहिले.

इतर वृक्ष निष्पर्ण दिसत असले तरी या वृक्षावरील पर्णराशी कायम होत्या. शिवाय अनेक पुष्पगुच्छांनी तो बहरला होता. जागोजागी फुललेल्या या पांढऱ्याशुभ्र गेंदांवर जांभळ्या, निळ्या चमकदार कांतीचे, चिमुकले सूर्यपक्षी मध पिण्यासाठी गर्दी करीत होते. याशिवाय शिपाई बुलबुल होते, जंगली मैना होत्या. या बहरलेल्या रोहितक वृक्षाकडे लक्ष गेले तेव्हाच मला शिशिर संपत आल्याची जाणीव झाली.

त्यानंतर आठवडाभरातच पांगारा फुलू लागला आणि निसर्गाच्या रंगपंचमीला खरीखुरी सुरुवात झाली. ही नयनरम्य रंगांची उधळण आपल्याकडे किती लोकांना जाणवते कोण जाणे! पण अमेरिकेसारख्या पाश्चात्य राष्ट्रांतून मात्र निसर्गाची रंगपंचमी पाहावयास हौशी प्रवाशांच्या झुंडीच्या झुंडी बाहेर पडतात. त्यांच्याकडे जिला ‘ फॉल कलर्स ’ म्हणतात ती रंगांची किमया सप्टेंबर अखेरीस सुरू होते. त्या वेळी झाडांची पाने पिकतात,

सुकतात आणि त्यांच्या तऱ्हेतऱ्हेच्या रंगछटांनी मोठमोठे वृक्ष अतिशय सुशोभित दिसतात. विविध रंगांनी नटलेले हे वृक्ष पाहण्यास हजारो नागरिक घराबाहेर पडतात.

आपल्याकडे मात्र हिवाळा सरत आला की पांगारा, पळस, काटेसावर, गणेरी असे वृक्ष फुलांनी बहरू लागतात. या वेळी या झाडांवरची सर्व पाने गळून जातात आणि फुलांनी भरगच्च झालेली ही झाडे इतकी सुंदर दिसतात की, त्यांवरून दृष्टी काढवत नाही.

जानेवारी महिना संपण्यापूर्वीच पांगारा बहरण्यास यावर्षी सुरुवात झाली. एकीकडे पाने गळून पडत असतात आणि भडक तांबडी, कुंकवाच्या रंगाची फुले फांद्याफांद्यावर उमलत असतात. मिटलेल्या, वळलेल्या पानांच्या आकाराचे हे तुरे झाडांवर ठायी-ठायी फुटू लागतात आणि या पुष्पमालांनी बहरलेले हे झाड अतिशय सुंदर दिसते. या फुलांमध्ये मधही भरपूर असतो. त्यामुळे पक्ष्यांची ही झाडे फार आवडती आहेत. मैना, कावळे, बुलबुल हे पक्षी या फुलांतील मध पिताना शहरातही दृष्टीस पडतात. मोठमोठ्या बागांतून, या फुलांवर सातभाई, सूर्यपक्षी, सुगरण, चोरडी असे सुंदर सुंदर पक्षी मध पिण्यासाठी गर्दी करतात.

मोठ्या, सरळ बुंध्यांच्या काटे-सावरीच्या झाडांची पानेही जानेवारी महिन्यातच गळून पडतात आणि फांद्यांवर कळ्यांचे गुच्छ लटकलेले दिसतात. काही दिवस हे निष्पर्ण झाड अगदीच ओकेबोके, भकास दिसते. मग मात्र एकेक कळी उमलू लागते आणि थोड्याच दिवसांत तांबड्या-भडक फुलांनी सारे झाड बहरून उठते. पाच पाकळ्यांची, पिवळे केसर असलेली ही लाल रंगाची फुले मांसल, जाड असतात. पांगारा आणि काटे-सावर हे वृक्ष आपल्याकडे रस्त्याच्या कडेने लावतात. मुंबईत अनेक रस्त्यांवर पांगाऱ्याचा बहर पाहावयास मिळतो. पुण्यात राजभवनावरून औंधकडे जाणाऱ्या रस्त्यावर काटे-सावरीचे प्रचंड वृक्ष ओळीने लावलेले आहेत. लाल फुलांनी हे वृक्ष डवरले की, जे दृश्य दिसते



त्याचे वर्णन शब्दांनी होणे शक्य नाही. कात्रज घाटाच्या रस्त्याकडेनेही काटेसावरीचे अनेक वृक्ष आहेत. खंडाळा घाटाखाली मुंबई-पुणे रस्त्यावरही दोन्ही बाजूंना मधून मधून हे वृक्ष दिसतात. आपल्याकडे खेडेगावातून, डोंगर-उतारांवर, माळरानावरही काटेसावर आढळते.

काटे-सावरीच्या फुलांतूनही मध भरपूर असतो. त्यामुळे या फुलांवरही मध पिण्यास तऱ्हेतऱ्हेचे पक्षी येतात. रानात या झाडाच्या जवळ उभे राहिले की, जवळपासचे बहुतेक सारे पक्षी एका ठिकाणी पाहिल्याचे सुख मिळते. कर्नाळा पक्षी-अभयारण्यातील बंगल्यासमोर काटे-सावरीचे झाड आहे. हे झाड बहरले की हळद्या, हिरवा बुलबुल, ट्री पाय यांसारखे सुंदर पक्षी या फुलांतील मध पिण्यास येतात आणि अभयारण्यात खूप भटकूनही जे पाहण्यास मिळणार नाहीत ते सुंदर पक्षीही बंगल्याच्या व्हरांड्यात बसून विनासायास पाहावयास मिळतात.

तांबडट-नारिंगी रंगाच्या फुलांनी डवरलेला पळसही असाच सुंदर दिसतो. खंडाळा घाटातून काही पळसाची झाडे आहेत. घाटाखालीही पळसाचे झाड दिसते. पण पळसाचा मोठा वृक्ष पुण्याच्या आसपास तरी पाहण्याचे सुख मला मिळालेले नाही. मध्यप्रदेशात मात्र पळसाचे मोठमोठे वृक्ष आहेत. पळसाची फुलेही पक्ष्यांना आकर्षित करणारी आहेत. पळस, पांगारा, काटे-सावर या तिन्ही लाल रंगाची फुले असलेल्या वृक्षांचे बीजवहनाचे कार्य पक्षीच करतात. यांपैकी काटे-सावरीच्या झाडांची संख्या सर्वांत जास्त असावी. लाल फुलांनी भरून गेलेली ही झाडे खूप दिसतात. पण सर्वच झाडांवर पक्षी येताना दिसत नाहीत. त्यांच्यासाठी पक्वान्नांची ताटे सर्वत्र वाढून ठेवलेली असतानाही भोजनार्थी नाहीत हे दृश्य आपल्या भुकेल्या देशात तरी अपूर्व म्हटले पाहिजे.

आपल्या रानात जरी पळसाची झाडे फारशी आढळत नसली तरी तितकाच प्रसिद्ध असा एक पुराणवृक्ष आपल्याला पाहावयास मिळतो. हा वृक्ष म्हणजे कदंब होय. उन्हाळ्याच्या सुरुवातीला

यालाही पांढऱ्या नाजूक फुलांचे अलंकार चढतात आणि त्यांच्या मंद सुवासाने सारा आसमंत दरवळून निघतो. धायटीच्या लालचुटक फुलांचे फुलोरे आणि सावरीच्या निष्पर्ण झाडाप्रमाणेच बहरणारी, पण फुले पिवळी असलेली गणेरी ही दोन आपल्या जंगलाची आणखी खास वैशिष्टये. काटे-सावरीच्या पाठोपाठच गणेरीही फुलते. आपल्या कात्रजच्या घाटात लाल फुलांची सावर आणि त्याशेजारी पिवळ्या फुलांची गणेरी असे मनोरम दृश्य पाहावयास मिळते.

हे सर्व वृक्ष आपला साज उतरवून पुन्हा पर्णवेष धारण करू लागतात न लागतात तोच जॅकारांडा फिक्या जांभळ्या वेषात सामोरा येतो, पाठोपाठ कॅशिआचे गुलाबी तुरे उमलतात, लाल, शेंदरी गुलमोहोर फुलतो आणि बहव्याचे जर्द पिवळे घोस असलेले मनोहर झाड पाहून आपले मन थक्क होऊन जाते. निसर्गाची ही अपूर्व रंगपंचमी थेट चैत्र सरेपर्यंत अखंड चालू असते.

✣ ✣

अकरा

# फुलांवर उडती फुलपाखरे

फार प्राचीन काळची गोष्ट आहे ही. पृथ्वीने यौवनात नुकतेच पदार्पण केले होते. अतिशय सुंदर दिसत होती ती. तिच्या लावण्यावर मोहित होऊन सागराने तिला मागणी घातली. पृथ्वीचे वडील म्हणजे सूर्यदेव. रूपवान आणि गुणसंपन्न सागर त्यांनाही पसंत पडला आणि पृथ्वीदेवीचे लग्न ठरले. आपल्या ताईचे लग्न ठरलेले ऐकून पृथ्वीच्या भावाला, चंद्रदेवाला, खूप खूप आनंद झाला. आनंदाच्या भरात त्याने आपल्याजवळच्या नानारंगी रत्नांचा खजिना पृथ्वीवर उधळला. पृथ्वीवर रत्नांचा पाऊस पडला. चंद्रदेवाने उधळलेली रत्ने म्हणजेच आपली फुलपाखरे.

फुलपाखरांच्या सुंदर सुंदर रंगांकडे पाहून कवीला अशी कल्पना सुचली नसती तरच नवल ! फुलपाखरे हा देशोदेशींच्या कवींचा आवडता विषय आहे. बालवर्गात असताना आपण सर्वांनी फुलपाखरांवरची एक कविता पाठ केलेली आहे. फुलपाखरांना पकडून आणि मारून त्यांचा संग्रह करण्याचा छंद फार जुना आहे. अतिप्राचीन काळी चिनी सम्राज्ञींचा हा आवडता छंद होता. मात्र अलीकडे रंगीत छायाचित्रे घेण्याची सोय झाल्यापासून फुलपाखरांना पकडण्याची आणि मारण्याची फारशी जरुरी उरलेली नाही.

फुलपाखरे आणि फुले यांचे अतूट नाते आपल्या मनात जुळून गेलेले असते. पण सर्वच फुलपाखरे फुलांकडे आकृष्ट होतात असे मात्र नाही. काही फुलांतला मध चाखतात, तर काही फुलांकडे मुळीच वळत नाहीत.

फुलपाखरे म्हणजे उडणाऱ्या कीटकांचा एक प्रकार. या कीटकाची शेवटची अवस्था म्हणजे फुलपाखरू. इतके सुंदर रूप धारण करण्यापूर्वी या कीटकाला तीन अवस्थांमधून जावे लागते. पहिली अवस्था म्हणजे अंडे. फुलपाखराची मादी आपली सूक्ष्म अंडी पानांवर किंवा पानांखाली घालून ठेवते. या अंड्यांपासून



अळीचा जन्म होतो. बहुधा ज्या पानांवर अंडी घातलेली असतात, तेच पान हे अळीचे खाद्य असते. आणि भरपूर खाण्यासाठीच जणू काही अळींचा जन्म असतो. अळीच्या पुढची अवस्था म्हणजे कोषावस्था. हे कोष पुष्कळदा एखाद्या काडीला किंवा गवताच्या पात्यांना लटकलेले असतात. या कोषातूनच सुंदर फुलपाखरू बाहेर पडते. कोष फोडून ते बाहेर येते तेव्हा ते अगदी लिबलिबीत असते. त्याच्या पंखांची आणि त्यावरील सुंदर रंगांचीही वाढ पूर्ण झालेली नसते. ही वाढ पूर्ण होईतो ते अगदी निपचित पडलेले असते.

या उडणाऱ्या कीटकांचे दोन प्रमुख प्रकार म्हणजे फुलपाखरे आणि पतंग. या दोघांनाही वरील सर्व अवस्थांमधून जावे लागत असले, तरी त्यांच्यात फरक आहे. फुलपाखरांच्या नांग्यांच्या शेवटी दोन सूक्ष्म गाठी असतात; तशा त्या पतंगांना नसतात. त्यांच्या पंखांच्या धाटणीतही फरक असतो. शिवाय पुष्कळसे पतंग संध्याकाळी व रात्री उडणारे आहेत, तर फुलपाखरांना बहुधा उजेड प्रिय असतो.

फुलपाखराचे शरीर म्हणजे सांधे जोडलेली एक नलिका असते. अनेक सूक्ष्म भिंगे जोडून फुलपाखराचा डोळा तयार होतो. पण त्यांच्या दृष्टीचा पल्ला फार छोटा असतो. हालचाल आणि रंग मात्र त्यांना दुरूनही जाणवतात. फुलपाखराचे वासाचे इंद्रिय त्याच्या नांग्यात दडलेले आहे, तर स्पर्शज्ञान त्याला पायांकडून होते. वास आणि चव फुलपाखराला समजते, पण त्याला ऐकण्याचे इंद्रिय नाही. नांग्यामुळे फुलपाखराला उडण्यालाही मदत होते. त्याच्या नांग्या तोडल्या तर ते भरकटत जाते किंवा हवेत उंच उंच चढते. त्याच्या शरीराच्या दोन्ही बाजूस असलेल्या छिद्रांतून ते हवा ओढून घेते व शरीरास पुरवते.

अळीने भरपूर खादाडपणा करून शक्तीचा साठा करून ठेवलेला असल्याने फुलपाखराला खाद्य शोधण्यासाठी वणवण करावी लागत नाही. फुलांतील मध आणि आर्द्रता यांवर ते जगू शकते. त्यामुळे जेथे ओलावा असेल तेथे फुलपाखरे जमलेली नेहमी दृष्टीस पडतात.

फुलपाखरांचे पंख अतिशय पातळ अशा दोन पापुद्र्यांचे बनलेले असतात. त्यावर सूक्ष्म खवले असतात आणि त्याचमुळे फुलपाखरांना सुंदर रंग प्राप्त होतात. मात्र मादी आणि नर यांचे रंग पुष्कळदा निराळे असतात. नर भडक रंगाचा असतो तर मादीचा रंग आजूबाजूच्या परिस्थितीशी बेमालूम जुळणारा असतो. त्यामुळे तिच्या शत्रूंना तिचे अस्तित्व चटकन लक्षात येत नाही आणि तिचे संरक्षण होते. काही फुलपाखरांचे रंग इतके भडक असतात की त्यामुळेच त्यांची शत्रूपासून सुटका होते. हे भडक रंग जणू शत्रूला धोक्याचा इशाराच देत असतात. खूपदा फुलपाखरे पंख मिटून बसतात. या स्थितीत ती अगदी वाळक्या पानासारखी दिसतात. हासुद्धा त्यांनी अवलंबिलेला संरक्षणाचा एक उपायच आहे. काही फुलपाखरे चवीला अगदी वाईट आणि विषारी असतात. अनुभवाने पक्षी किंवा सरडे अशा फुलपाखरांच्या वाटेस जाऊ नये हे शिकतात. मग इतर फुलपाखरे या विषारी फुलपाखरांचे रंगरूप धारण करतात आणि शत्रूला चकवितात.

काही जातींची फुलपाखरे तर संरक्षणासाठी एक विलक्षण युक्ती योजतात. ती चक्क मुंग्यांची मदत घेतात. ती आपली अंडी जेथे मुंग्या असतील अशा ठिकाणी घालतात. अंड्यांचे आणि त्यापासून बाहेर पडलेल्या अळीचे मुंग्या, इतर कीटक-शत्रूंपासून संरक्षण करतात. त्याबद्दल मोबदला म्हणून या मुंग्या आपल्या नांग्यांनी अळीच्या पार्श्वभागाला हलकेच डिवचतात. डिवचण्यामुळे या भागातून गोड रस स्रवू लागतो. तो मुंग्यांना आवडतो. अळीचे संरक्षण करण्यासाठी मुंग्या तिच्यावर आच्छादन उभारतात, कोषाला सांभाळतात आणि त्यातून फुलपाखरू बाहेर पडले की त्याला सुरक्षित स्थळी नेऊन सोडतात.

काही फुलपाखरांच्या पंखांच्या खाली घुबडाच्या डोळ्यांसारखे मोठे, गोल गोळे असतात. त्यांचाही उपयोग शत्रूंना घाबरवण्यासाठीच होतो.

आपल्या भारतात अनेक जातींची सुंदर सुंदर फुलपाखरे



सापडतात. हिमालय, सिक्कीम, भूतान, आसाम, सह्याद्री, निलगिरी आणि दक्षिणेतील जंगले यांमधून अनेक सुदर फुलपाखरे बागडताना आढळतात. एका परदेशीयाने तर भारताला 'फुलपाखरांचा स्वर्ग' म्हटले आहे.

आपल्या बागेत नेहमी येणाऱ्या फुलपाखरांमध्ये गवतात आढळणारे पिवळे लहान फुलपाखरू आणि नारिंगी रंगाचे आणि पंखांवर काळ्या ठळक रेषा असणारे 'टायगर' फुलपाखरू ही प्रमुख आहेत. ही टायगर फुलपाखरे पुष्कळदा थव्यांनी आढळतात आणि स्थलांतरही करतात. निळसर पंख आणि त्यांवर काळ्या रेषा असलेली 'ब्ल्यू टायगर' ही फुलपाखरेही बागेत पुष्कळदा दिसतात. उंच भराऱ्या घेणारे, पिवळ्या पंखांवर काळ्या रेषा असलेले 'जेझेबेल' हे सुंदर फुलपाखरूही आपल्या बागेत पाहावयास सापडते. या फुलपाखरांच्या पंखांच्या कडांवर तांबडे ठिपके असल्याने त्याचे सौंदर्य अधिकच खुलून दिसते.

काळे पंख आणि त्यांवर अनेक प्रकारची पांढऱ्या रंगाची रचना असलेले 'क्रो' फुलपाखरू बागेत, ओलाव्याची जागा असेल तर तेथे, पुष्कळदा मोठ्या संख्येने पाहावयास सापडते. कधी खंडाळ्याला गेलात तर तिथे डोंगरात या 'क्रो'च्या अनेक जाती पाहावयास सापडतील. काळ्याच रंगाचे पण आकाराने मोठे, पंखांना पाठीमागे दोन बारीक शेपट्या असलेले, गुलाबी अंग आणि पंखांवर गुलाबी ठिपके असलेले 'कॉमन मॉरमोन' हे फुलपाखरू बागेत, गावाबाहेर माळरानावर, मळ्यातून उडताना दिसते. अतिशय झपाटा अंगात असलेले हे फुलपाखरू आपल्याकडील एक अत्यंत मोहक फुलपाखरू आहे.

जगातील अत्यंत सुंदर फुलपाखरांपैकी काही हिमालयात सापडतात. त्यांपैकी 'पीकॉक' या वर्गातील फुलपाखरे मोहक रंगांसाठी प्रसिद्ध आहेत. 'ओकलीफ' या जातीची फुलपाखरेही आकार आणि रंग यांमध्ये अजोड आहेत. भारतातील आकाराने सर्वांत मोठे फुलपाखरू म्हणजे दक्षिणेतील जंगलात आढळणारे

'कॉमन बर्डविंग' हे होय. त्याच्या पंखांची रुंदी १९० मि. मी. असते. आपल्या सह्याद्रीतही 'ब्ल्यू मॉरमोन' हे मोठ्या आकाराचे (१५० मि. मी. पंखांची रुंदी) सुंदर फुलपाखरू आढळते.

लहान फुलपाखरांचे आयुष्य तीन ते सहा आठवडेच असते. मोठी फुलपाखरे मात्र सहा महिन्यांपर्यंतही जगू शकतात. काही थंडीच्या दिवसांत सुरक्षित जागी सुस्त पडून राहतात आणि वसंत ऋतूत पुन्हा बाहेर पडतात.

सूर्य चांगला वर आला की फुलपाखरे बागडू लागतात. दुपारीही ती पुष्कळदा हिंडताना दिसतात. मात्र सूर्यास्ताबरोबर तीही झोपी जातात. पावसाळा संपल्यानंतर ऑक्टोबर-नोव्हेंबर हे महिने आणि वसंत ऋतू हे दिवस फुलपाखरे पाहण्यास जास्त योग्य.

उन्हाळ्याच्या सुट्टीत थंड हवेच्या ठिकाणी सहलीसाठी गेलात तर तिथे कोणती फुलपाखरे दिसली ही नोंद ठेवण्यास विसरू नका बरं का !

✠ ✠

बारा

# पतंग

परवा एक नवीनच पाहुणा आमच्या घरात आला. रात्रीची वेळ. सर्व माणसे झोपण्याच्या तयारीत होती. दिवा मालवण्यासाठी मी भिंतीजवळ गेलो आणि माझे त्याच्याकडे लक्ष गेले. केळीच्या पानासारखे, टोकाला निमुळते होत गेलेले त्याचे दोन हिरवे पंख मधल्या फुगीर शरीराच्या दोन्ही बाजूंना विसावले होते. या पंखांवर हिरव्या रंगाच्या अनेक छटांच्या लाटा होत्या, मधून गुलाबी किनारी होत्या आणि या सर्व रेषा एकमेकीशी जोडून त्रिकोणी, अर्धगोलाकार, लंबगोलाकार असे चित्रविचित्र आकार निर्माण झाले होते. जणू काही आधुनिक पद्धतीचे एक सुंदर चित्रच भिंतीवर डकविलेले आहे ! निसर्गाने निर्माण केलेले हे सुंदर शिल्प पाहत असताना आपण दिवा मालविण्यासाठी आलो आहोत याचाच मला विसर पडला.

नंतर रोज रात्री आमच्या घरी या पाहुण्यांची रीघच लागली. भिंतीवर, फ्ल्युओरेसन्ट ट्यूबजवळ रोज कोणते नवीन पतंग दिसतात याची आम्ही उत्कंठेने वाट पाहू लागलो. नवीन पतंग दिसला की, आरडाओरड करून मुले एकमेकांना बोलावू लागत त्याला पाहण्यासाठी. आणि हे पतंग तरी असे गमतीदार, तास न् तास आपले एका जागी बसून राहत. जणू जपाला, अनुष्ठानाला बसले आहेत.

तपकिरी रंगाच्या पतंगांची संख्या नेहमीच जास्त असे. त्यांचा आकारही पुष्कळदा इतर पतंगांपेक्षा मोठा असे. पण त्या तपकिरी रंगातही किती छटा ! काहींच्या पंखांत जांभळा मखमली रंग असा बेमालूम मिसळलेला असे की एखाद्या मूल्यवान खड्यातून हा पतंग कोरून काढलाय की काय असे वाटे ! लहान पंखांच्या, उभट आकाराच्या, एखादा तंबू उभा केलाय असे दिसणाऱ्या पतंगांच्या अंगावर सुवर्णाचा वर्ख जडवावा अशी सुंदर नक्षी असे.

काही इवलेसे पतंग सोनेरी, आम्ररंगाचे होते. त्यावर तपकिरी रंगाची नाजूक नक्षी होती. त्यांचा आकारही असा होता की, दुरून वाटावे समुद्रात मिळणारा शिंपला उलटा डकविला आहे. काही पतंगांचे पाय चांगले लांब होते. त्यामुळे भिंतीसरसे, भिंतीला चिकटून त्यांना बसताच येत नसे. भिंतीवर खुर्ची ठेवून बसल्यासारखे किंवा शेकाटयांवर उभे राहिल्यासारखे दिसत ते. काहींच्या पंखांना दोन बारीक शेपटचा होत्या. लांब पायांचे, बारीक शेपटीचे आणि पंख पारदर्शक असलेलेही पतंग आमच्या इथे येऊन गेले.



आणि एका रात्री तर कमालच झाली. एक असा सुंदर पतंगराज अवतीर्ण झाला की, आम्ही अवाक् झालो. त्याच्या सौंदर्याचे वर्णन करण्याची नकळत एकमेकांत स्पर्धा लागली. खुर्च्यांवर चढून पाय उंच करून मुले त्याला जवळून पाहण्यासाठी धडपडू लागली.

मला वाटले, तलम रेशमी कापडाचा तुकडा तर कोणी भिंतीला चिकटविलेला नाही ना ? जवळून पाहिले तेव्हा त्याच्या पंखांवरची नाजूक नक्षी दिसली. मुलायम, शुभ्र संजिऱ्यातून त्याला घडविल्यासारखा दिसत होता, की समुद्रफेस होता तो ! त्याचे इंद्रधनुष्याकृती पंख बाजूने नक्षीदार होते. जणू कात्रीने हळुवार कापून त्यांची झालर बनविण्याचा प्रयत्न कोणी केला आहे. पंखांना शेवटी दोन छोटी टोके होती– स्वॅलो-टेल फुलपाखरांना जशी शेपूट असते तशी. या शेपटचा जेथून सुरू होत होत्या तेथे गर्द जांभळा गोल ठिपका होता, रत्न जडवावे तसा. हे रेशीमपाखरू कितीतरी वेळ एका जागी स्तब्ध बसून राहायचे. मग काही वेळ पंख फडफडावीत उडायचे आणि क्षणभर जमिनीवर टेकायचे. ते कोठून येई आणि केव्हा निघून जाई हे मात्र शेवटपर्यंत आम्हांला कळले नाही.

इतके सुंदर सुंदर पतंग आमच्या येथे येत होते, पण या निशाचरांचे छायाचित्र घेता येत नाही याची मला रुखरुख लागली होती. पण लवकरच एका पतंगाला आमची दया आली. त्या दिवशी रात्री त्याला मी नेहमीप्रमाणे भिंतीवर पाहिले होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी तो भिंतीवर नव्हता; पण खिडकीच्या काचेवर बसलेला मला आढळला. कदाचित खिडकीतून बाहेर जाण्याचा प्रयत्न त्याने केला असावा; पण खिडकी बंद असल्याने त्याचा नाइलाज झाला होता. त्याला बाहेर जाता यावे म्हणून मी हळूच खिडकी उघडली आणि त्याच्या पंखांना स्पर्श केला. त्यासरशी तो उडाला, तो थेट बागेतल्या वांग्याच्या रोपाच्या पानावर बसला. आता तो छान उन्हात बसला होता आणि त्याचे छायाचित्र घेणे फारसे अवघड नव्हते.

फुलपाखरे त्यांच्या अनेक मनोरम रंगांनी आपले लक्ष वेधून घेतात. पण फुलपाखरांच्यापेक्षा पतंगांची संख्या किती तरी जास्त आहे. त्यांच्या अक्षरशः हजारो (सुमारे १ लाख) जाती आहेत. त्यांच्यात आणि फुलपाखरांच्यात मुख्य फरक असा की फुलपाखरांच्या नांग्यांना टोकाशी दोन सूक्ष्म गोळे असतात तसे पतंगांना नसतात. शिवाय पुष्कळसे पतंग रात्री बाहेर पडणारे आहेत. त्यामुळे त्यांच्याकडे आपले लक्ष चटकन् जात नाही. आकारांची विविधता मात्र पतंगांमध्येच जास्त आहे. पंखांची एका कडेपासून दुसऱ्या पंखांच्या कडेपर्यंत फूटभर लांबी असलेले पतंगही अस्तित्वात आहेत. फुलपाखरांप्रमाणेच पतंगांची दुनियाही वेधक आणि विलक्षण आहे.

* *



तेरा

# हिमालयाची निसर्गयात्रा

मे-जून हे महिने म्हणजे हिमालयात जाण्याचा मोसम. या दिवसांत वयस्कर मंडळी हिमालयातील तीर्थस्थानांच्या यात्रेला जातात, तर तरुण मंडळी जातात गिर्यारोहण करायला— हिमालयातील बर्फाच्छादित शिखरे चढायला किंवा तेथले अलौकिक सृष्टिसौंदर्य डोळे भरून पाहण्यासाठी. मी आज तुम्हांला असेच भटकायला घेऊन जाणार आहे हिमालयात, आणि थोडे फार पुण्य गाठीशी बांधूनच परतणार आहोत आपण.

मुंबईला जसे भारताचे प्रवेशद्वार म्हणतात, तसे हरद्वारला हिमालयाचे प्रवेशद्वार म्हणायला हरकत नाही. इथूनच हिमालयातील निरनिराळ्या गावांना जाण्यासाठी रस्ते फुटतात. आपण थेट हरद्वारला रेल्वेने पोहोचू. तिथल्या गंगेच्या प्रवाहात स्नान करून, जाऊ जवळच हृषिकेशला. तिथे आपल्याला लक्ष्मणझूला हा झुलता पूल पाहायचाय, आणि गंगेच्या विशाल पात्राच्या कडेने उभी असलेली गीता-भवन वगैरे मंदिरे पाहायची आहेत.

आता उत्तर दिशेकडे दृष्टी टाका. हिमालयाच्या लहानमोठ्या टेकड्यांनी आपली दृष्टी अडवली आहे. या टेकड्यांमधूनच वळणे वळणे घेत गंगा नदी हृषिकेशपर्यंत येते आणि तेथे मैदानी प्रदेशात शिरते. आता हिमालयाच्या अंतर्भागात खूप रस्ते झालेत. एक रस्ता गंगेच्या काठाने वळसे घेत थेट बद्रिनाथच्या मंदिरापर्यंत जातो. पण बसच्या प्रवासात काही हिमालयात भटकण्याची मौज थोडीच मिळणार आहे ! आपण आहोत जवान लोक. जरुरीपुरती बस, बाकी आपले पाय आणि आधाराला नगाधिराज हिमालय. आपण मुद्दामच वाकडा रस्ता करणार आहोत. असे हिमालयाच्या पोटात शिरल्याशिवाय तो आपले सौंदर्य थोडेच उघडे करणार आहे ?

गंगेच्या उजव्या तीरावरून आपण जाऊ या टिहरीला. हिमालयाच्या पायथ्याच्या रांगांमधून वळणे घेत चार-पाच तासांत बस येते टिहरीला. टिहरी आहे कसे सुंदर, टुमदार गाव— साधे आणि स्वच्छ. जणू स्वीत्झरलंडच्या चित्रात पाहिलेल्या देखाव्यांची



आठवण होतेय. गावाच्या मधून भागीरथी नदी खळखळ वाहत्येय. तिला पुढे अलकनंदा आणि मंदाकिनी नद्या मिळतील आणि या तिघींच्या प्रवाहाला गंगा असे नाव मिळेल.

टिहरीपासून बसने आणखी थोडे पुढे जाऊ या, घन्साळी गावापर्यंत. संध्याकाळ होत आली आहे. घन्साळीचे सौंदर्य पाहावयास दिवस उजाडेपर्यंत थांबावे लागणार आहे आपल्याला. उद्या लवकर उठायचे बरं का !

चला, सकाळी सहालाच पुढे निघू या आपण. तो पाहा त्या टेकडीमागून सूर्य उगवला. देवदारूच्या बनात त्याची किरणे घुसली. भिलंगना नदीच्या सुसाट प्रवाहाला त्यांनी तेजाळले. या नदीच्या प्रवाहातले ते चिमुकले बेट, त्यावर जाण्यासाठी बांधलेला सुंदर लाकडी पूल पाहिलात ? या टेकड्या पाहा, देवदारूच्या उंच वृक्षांनी नटल्या आहेत. आणि पक्ष्यांची किलबिल किती ऐकू येते आहे ! तो पाहा समोरच्या झाडावर किती सुंदर पक्षी येऊन बसला. त्याचा मोहक जांभळा रंग, चमकदार काळे डोके आणि तांबडी चोच— आणि त्याची शेपटी पाहिलीत ? केवढी लांब आहे ! तो उडू लागला की कशी डौलदारपणे मागे रुळतेय पाहा. हा तांबड्या चोचीचा मॅगपाय (दयाळ) बरं का ! या सुंदर पक्ष्याला प्राणीसंग्रहालयात मोठ्या हौसेने ठेवतात.

भिलंगनेच्या काठाकाठाने आपण पुढे जाऊ या. डोंगर-उतारावरून धडाधड उड्या टाकीत येणारे नितळ पाण्याचे हे प्रवाह पाहिलेत ? शीण वाटला तर हे बर्फासारखे थंड पाणी अंगावर घ्यावे, पोटात घ्यावे. अमृतासारखी चव आहे त्याची. वाटेत छोट्या छोट्या वाड्या लागताहेत. लोकांनी डोंगरउतारावर खाचरे पाडली आहेत, त्यांची नांगरट चालली आहे. पावसाची वाट पाहत आहेत लोक.

संध्याकाळी घुत्तु गावात मुक्काम करू या आपण. कारण दुसऱ्या दिवशी पवालीचा मोठा पहाड चढून आपण दहा हजार फूट उंचीवर पोचणार आहोत. एवढे पुढचे वळण घेतले की घुत्तु

दिसू लागेल.

ओहो ! ते पाहा दूरवर काय दिसतंय ! हे आपले हिमाच्छादित पर्वताचे पहिलेच दर्शन. सतोपंथ नावाचे ते प्रख्यात हिमशिखर आहे. नीलाकाशात घुसलेला त्याचा प्रचंड सुळका शिवाच्या शूलाची आठवण करून देतो, नाही ? पण आता थोडाच धीर धरा. पवालीच्या पहाडावर पोहोचलो की विशाल हिमालयाचे खरे दर्शन होईल तुम्हाला.

दमादमाने चढा. सहा हजार फूट उंच चढून जायचंय आपल्याला. सबंध दिवस आज चढावे लागणार आहे. आजूबाजूचे पहाड पाहा, कसे निबिड जंगलांनी व्यापले आहेत. अंधार पडायच्या आत माथ्यावर पोहोचले पाहिजे आपल्याला.

आता आलाच माथा. पाहा, केवढे मोठे पठार आहे ! आणि सगळीकडे हिरवे हिरवे लुसलुशीत गवत ! मध्येच सूचिपर्णी वृक्षांचे समूह खडे राहिलेले. आणि ही फुले पाहिलीत ? जांभळी पॉपी, प्रिम्युला, पिवळ्या फुलांचे तर गालिचेच पसरले आहेत सगळीकडे. तो लाल फुलांनी बहरलेला ऱ्होडोडेंड्रोन पाहिलात ? हिमालयाचे वैभव आहे तो !

आता समोर नजर टाका. आश्चर्याने अवाक् झालात की नाही? केवढा हा ढगांचा समुद्र आणि त्यामधून डोकावणारे हिमाच्छादित शिखरांचे माथे-सुळके ? केवढं भव्य, जगड्व्याळ दृश्य ! मावळत्या सूर्याच्या किरणांनी या नगाधिराजांना सुवर्णमुकूट घातले आहेत जणू ! असं वाटतंय, ब्रह्मांडनायकाचा दरबार भरला आहे. या नगाधिराजांची नावे सांगू तुम्हांला– हे श्रीकंठ, हे मारीच, हे करचकुंड, त्यानंतर केदारनाथ, मंदार, सतोपंथ, बद्रिनाथ, त्रिशूळ, नीळकंठ आणि अगदी टोकाला ते नंदादेवी– भारतातले सर्वोच्च शिखर. आकंठ पिऊन घ्या हे भव्योदात्त दृश्य. तुमच्या मन:पटलावर कायमचे कोरलेले राहील ते !

आता संध्याकाळ होत आली. आकाशात ढग जमू लागले आहेत. कदाचित गारांचा पाऊस पडेल, कदाचित हिमवृष्टीही होईल.



सूर्य मावळल्याबरोबर हवेत किती गारठा आला पाहिलात ! चला, गरम गरम खाऊन उबदार अंथरुणात शिरू या...

आता आपली वाटचाल डोंगराच्या माथ्यावरूनच होणार आहे. बारा हजार फूट उंचावरची एक खिंड पार करून आपण सोमगंगेच्या खोऱ्यात उतरणार आहोत. काल रात्री आपण निद्राधीन असताना बर्फ पडलाच बरं का ! समोरच्या माथ्यावर तो अजून साचून राहिलाय. डोंगराच्या घळईतून बर्फाच्या पांढऱ्या सोंडा खाली रुळतायेत. हातात घ्या तो कापसासारखा मऊ बर्फ. त्याचे गोळे करून एकमेकांना मारलेत तरी लागणार नाहीत. हवे तर लोळून घ्या त्या मऊ लादीवर. कपडे ओले नाही होणार.

हळूहळू आपण चढतो आहोत, हे लक्षात आले का तुमच्या ? पवाळी पहाडाच्या उतारांवरील घनदाट जंगले मागे पडली. कुठे कुठे खुज्या झाडांचे पुंजके दिसताहेत तेवढेच. जवळजवळ बारा हजार फूट उंची गाठली म्हणजे वृक्षरेषा मागे टाकली आपण. हिमालयाचे अक्राळविक्राळ पहाड आता चहूबाजूला खडे आहेत. त्यांच्या मधल्या दऱ्या पाहा किती खोल. खाली पाहिलेत तर डोळे फिरतील. जागोजागी उंच पहाडावरून कोसळणारे प्रवाह पाताळात पडताहेत. मध्येच बर्फाचा लोंढा दरीत गडगडत गेल्याचा घनगंभीर आवाज उमटतोय. क्षितिजावरचे ते तेज:पुंज हिमपर्वत पाहिलेत ? डोळे दिपतात त्यांच्याकडे पाहताच. हिमालयाचे हे सौंदर्य निराळेच ! मोठे रौद्र-भीषण रूप हे !

हा संथपणे, पंख पसरून उडणारा पक्षी कोणता बुवा ! तो पाहा त्या कड्यावर तो उतरला. मोठ्या रुबाबात त्याने आपले लांब पंख शरीराभोवती लपेटून घेतले. या दुर्बिणीतून पाहा. हा आहे गरुडराज. या देखण्या, निधड्या छातीच्या भव्य पक्ष्याला हे दुर्गम पहाडच आवडतात.

आता आपण उताराला लागतो. आपण गरुड ज्या ठिकाणी पाहिला, तो खिंडीचा माथा. तिथून आता उतरत जाणार आपण. उतार इतका आहे की वेग आवरता आवरता नको होईल.

वाटेत त्रिजुगीनारायणाच्या मंदिरात थांबू या. हवे तर इथल्या कुंडात स्नान करा. आता आपण यात्रा मार्गाला येऊन मिळालो. आता केदारनाथपर्यंत यात्रेकरूंचे तांडेच्या तांडे भेटतील आपल्याला. बहुसंख्य यात्रेकरूंना अजूनही शेवटचे दहा-बारा मैल पायीच जावे लागते. ज्यांना ते सोसत नाही, ते घोड्यावर बसतात किंवा डोलीत बसतात.

हा पाहा सोमप्रयागचा पूल आला. डावीकडून येणारी ही नदी सोमगंगा आणि उजवीकडून प्रचंड शिळांना लोटीत येणारी मंदाकिनी. केदारनाथ मंदिराच्या मागील हिमनदीमध्ये तिचा उगम आहे. आता आपली वाट मंदाकिनीच्या काठाने चढत जाते. खडकाळ मार्गातून वाट काढीत धावणाऱ्या या नदीचे जीवनसंगीत कसे मन्द्र-गंभीर वाटते नाही ?

त्या मोठ्या शिळेवर बसलेला तो चिमुकला पक्षी पाहिलात ? ती पाहा त्याने पाण्यात सुरकांडी मारली. अजून पाण्याखालीच आहे तो. पटकन पलीकडच्या शिळेवर आता येऊन बसला पाहा तो. त्याचे नाव डिपर, म्हणजे बुडचा मारणारा, पाण्यातले कीटक पकडण्यासाठी सारखा बुड्या मारीत असतो तो. बर्फासारख्या गार पाण्याची मुळीच पर्वा करीत नाही तो.

मंदाकिनीच्या काठाने आपण वर चाललोच आहोत. बाजूच्या पर्वतांचे माथे बर्फाने माखलेले दिसताहेत. मंदाकिनी राहिली खाली खोल घळईत. तिचा प्रवाह कसा एखाद्या रुपेरी शलाके-सारखा दिसतोय. चढत चढत आपण घळईच्या तोंडाशी येऊन पोहोचलो. केवढा प्रचंड देखावा उलगडला आपल्या डोळ्यांसमोर! पार्श्वभूमीला केदारनाथ पर्वताचे उत्तुंग शिखर गगनाला गवसणी घालून उभे आहे. त्याचे सरळसोट हिमकडे पाहून छाती दडपते. ते चढणे काही शक्य दिसत नाही या बाजूने. बावीस हजार फूट उंचीचे हे शिखर एका इंग्लिश तुकडीने प्रथम जिंकले. पण या बाजूने नाही बरं का ! बद्रिनाथकडून जाऊन त्याच्या उत्तर उतारावरून ते वर चढले. आता आपण ११,७५३ फूट उंचीवर उभे आहोत. म्हणजे अजून ११,००० फूट उंच आहे केदारनाथ शिखराचा माथा.





केदारनाथ पर्वताच्या पायथ्याशी तो हिमनदीचा प्रचंड विस्तार पाहिलात ? या हिमनदीतच मंदाकिनीचा उगम आहे. सध्या उन्हाळ्याचे दिवस असल्याने हिमनदीतला बर्फ बहुतेक वितळून गेला आहे. मोठमोठ्या शिळा उघड्या पडल्या आहेत.

दुरून चिमुकल्या मनोऱ्यासारखे दिसणारे ते केदारनाथचे मंदिर. चला, जवळ जाऊन दर्शन घेऊ या. मंदिराचे शिल्प साधेच पण सुबक आहे– त्याच्या भव्यतेला उठाव देणारे. हिमालयाच्या उत्तुंग पार्श्वभूमीवर हा साधेपणा अधिकच खुलून दिसतो नाही ? मंदिराच्या अगदी आतल्या गाभाऱ्यात एक त्रिकोणी शिला दिसते ना, तोच केदारनाथ ! यात्रेकरू त्याला तुपाचा अभिषेक करतात. ते पाहा, महाराष्ट्रातून आलेले एक वारकऱ्यांचे पथक दर्शनासाठी आत चालले आहे. आता संध्याकाळी ग्यानबा तुकारामच्या गजराने केदारनाथाचा परिसर दुमदुमणार !

दर्शन करून आपण मागच्या हिमनदीत प्रवेश करू. बघू त्या प्रचंड शिळांतून मार्ग काढता येतो का आपल्याला.

वाटेत शंकराचार्यांचे स्मृतिमंदिर पाहू. शंकराचार्यांनी केदार-

नाथाची प्रतिष्ठापना केली असे म्हणतात. या कालापासून येथील यात्रा अखंडपणे चालू आहे. पण हे स्थान महाभारत कालापासून सुप्रसिद्ध होते, असेही म्हणतात. पांडवांनी येथूनच स्वर्गाचा रस्ता धरला.

मंदाकिनीच्या बाल-प्रवाहात बागडणारा हा चिमुकला पक्षी पाहिलात ? त्याने डोक्यावर घातलेली शुभ्र टोपी, तुकतुकीत गडद निळे पंख, तांबडे पोट आणि शेंपूट यामुळे किती मोहक दिसतो तो ! दहा हजार फूट उंचीवरचे हिमालयीन प्रवाह हीच त्याची निवासस्थाने. त्याला म्हणतात पांढरी टोपी घातलेला रेडस्टार्ट. त्याच्या सोबतीने आपण हिमनदीत प्रवेश करू.

बाप रे ! केवढ्या मोठ्या शिळा या ! एकेक घराएवढी ! ! पण अधूनमधून वाट काढू या आपण. या शिळासमुद्रात एकदा शिरले की दिशा सापडणे कठीण. पण उत्तरेकडचा केदारनाथ शिखराचा माथा समोर ठेवून चढू या आपण. आता किंचित डाव्या बाजूला, म्हणजे आग्नेयेकडे वळा. शिळांमधून शेकडो प्रवाह ठिबकताहेत. निसरड्या शिळांवरून जपून ! हे शेकडो प्रवाह केदारनाथ मंदिराजवळ एकत्र झाले की आपण त्यांना म्हणतो 'मंदाकिनी.' आता समोरची ती प्रचंड शिळा उजव्या बाजूला टाकून पुढे व्हा. काय दिसले ?

केवढे विशाल सरोवर ! त्याच्या बाजू कशा हिमाने व्यापल्या आहेत. बाजूच्या भव्य पर्वतांची प्रतिबिंबे पडली आहेत त्याच्या शांत पाण्यात. किती शांत वाटते इथे ! मोठे भावना उचंबळ-विणारे, मन निर्मळ करणारे ते दृश्य. मंदाकिनीचा उगम इथूनच होतो. पांडव स्वर्गाला गेले, ते याच ठिकाणापासून असे म्हणतात. पूज्य बापूजींची रक्षा याच सरोवरात विसर्जित केली. प्रवासाचा सारा शीण पळाला नाही का ? या स्थानाजवळून हलूच नये, असे वाटते. आपली निसर्ग-यात्रा इथे समाप्त झाली. आता खाली उतरून सोमप्रयागजवळ बस घ्यायची आणि हृषिकेशला परतायचे.

* * *